# नवभारत

जुलै २०१३



❋ दुर्योधन व भीम ह्यांचे गदायुद्ध

❋ कलाकृतीचा अर्थ आणि आस्वादकाचे आकाश

❋ पुस्तक परीक्षण
पञ्चवार्तिक - पंडित भीष्माचार्य
(मराठीतील आद्य व्याकरणग्रंथ, १३ वे शतक)



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६५ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळयांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदान-प्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारत' ने कार्य करीत राहावे असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित-वाङ्‌मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारत' पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयातील ग्रंथालयात अद्ययावत् पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयातून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांना आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारत'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारत'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रू. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारत'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

**- संपादक मंडळ**

# लेखकांस आवाहन

*नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.*

*४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६६ । अंक १० । जुलै २०१३
ज्येष्ठ / आषाढ, शके १९३५
वार्षिक वर्गणी ३०० रुपये
या अंकाची किंमत रु. २०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## जुलै २०१३

## अनुक्रमणिका

# दुर्योधन व भीम ह्यांचे गदायुद्ध

अरुण विनायक जातेगांवकर
वासंती अरुण जातेगांवकर

कौरव-पांडवांमध्ये घडलेला भेद आणि त्यातून त्यांच्यामध्ये पुढे उद्‌भवलेले सर्वंकष युद्ध ही महाभारताची मध्यवर्ती कथा अनेक नाट्यपूर्ण प्रसंगांनी नटलेली आहे. तथापि, त्यातले कथेच्या व नाट्याच्या दृष्टीने विशेष उठून दिसणारे प्रसंग आहेत, द्यूत व दुर्योधनवध. कुशल व नाट्यपूर्ण प्रसंगरचना हे व्यासांच्या वाङ्‌मयीन शैलीचे वैशिष्ट्य महाभारताच्या सर्वच ठळक प्रसंगांमध्ये पाहायला मिळत असले, तरी महाभारताच्या कथेतली दोन उत्तुंग शिखरे असलेल्या ह्या दोन प्रसंगांची त्यांनी केलेली रचना समर्पकच नाही, तर दिपवून सोडणारी आहे. पहिल्या प्रसंगी युधिष्ठिर द्यूतप्रिय होता, पण ते खेळण्यात तो कच्चा होता ह्याचा गैरफायदा घेऊन पांडवांचे राज्य कौरव हिरावून घेतात; एवढेच नव्हे तर पांडवांच्या प्रतिष्ठेची लक्तरे करून त्यांना ते देशोधडीस लावतात. दुसऱ्या प्रसंगी दुर्योधन 'अजिह्मयोधिन्'– कपट न वापरता लढणारा–योद्धा होता, ह्याचा गैरफायदा घेऊन पांडव त्याला छलाने ठार मारतात व गेलेले आपले राज्य परत मिळवतात; एवढेच नव्हे तर द्यूतात कौरवांनी केलेल्या त्यांच्या अप्रतिष्ठेचा ते सूड उगवतात.

प्रस्तुत लेख दुर्योधनवधातल्या मध्यवर्ती घटनांवर आहे. त्या घटना अशा : कौरव-पांडवांमधल्या युद्धाच्या अठराव्या दिवशी दुर्योधन व भीम ह्यांच्यामध्ये निकराचे व निर्णायक गदायुद्ध होते; त्यात भीम दुर्योधनाच्या मांड्या फोडतो; आणि त्या धर्मबाह्य प्रहारावरून मग रणभूमीवर वादंग माजते. शल्यपर्वाच्या बत्तीस, तसेच छपन्न ते साठ ह्या सहा अध्यायांमध्ये संजयाने धृतराष्ट्राला वर्णिलेल्या त्या नाट्यमय घटनांचे वाङ्‌मयीन दृष्टिकोनातून विवेचन व रसग्रहण करणे हे प्रस्तुत लेखाचे उद्दिष्ट व स्वरूप आहे.

गदायुद्धाकडे वळण्यापूर्वी, भीमाने सभापर्वात केलेल्या व दुर्योधनाबरोबरच्या गदायुद्धाशी निगडित असलेल्या दोन सर्वश्रुत प्रतिज्ञांविषायी थोडी माहिती देणे इष्ट ठरेल. आपणा सर्वांना माहीत असते, की युधिष्ठिर द्यूतात द्रौपदीचा पण हरल्यावर दुर्योधनाने तिला भरसभेत स्वतःची डावी मांडी उघडी करून दाखवली होती; आणि ते पाहून संतप्त झालेल्या भीमाने, 'तुझी ती मांडी मी युद्धात गदेने फोडेन', अशी प्रतिज्ञा केली होती; तसेच, अनुद्यूतात युधिष्ठिर हरल्यावर त्याच्याबरोबर वनात जाताना भीमाने दुर्योधनाला 'गदायुद्धात तुला मारून मी तुझ्या मस्तकावर पाय ठेवेन,' असे प्रतिज्ञेवर सांगितले होते. भीमाने त्याच्या त्या प्रतिज्ञा पुऱ्या करण्यासाठी गदायुद्धात दुर्योधनाच्या मांड्या फोडल्या व त्यानंतर त्याच्या मस्तकावर पाय ठेवला, असे मानण्याचा प्रघात आहे. त्या दोन्ही प्रतिज्ञा संशोधित आवृत्तीत[1] द्यूताच्या प्रसंगी असून त्यांतल्या पहिल्या प्रतिज्ञेचा संशोधित आवृत्तीतल्या गदायुद्धाच्या प्रसंगी कृष्णाच्या तोंडी चारदा उल्लेख आहे (ते सर्व उल्लेख लेखात समाविष्ट केले आहेत). तथापि, त्या प्रतिज्ञा एके काळी संहितेत नव्हत्या–भीमाने स्वतःचा जीव वाचवण्यासाठी गदायुद्धात प्रतिद्वंद्व्यावर नाभीखाली (अधोनाभि) प्रहार करून केलेल्या अधर्मावर, तसेच मरणोन्मुख पडलेल्या शत्रूच्या मस्तकावर पाय ठेवून त्याने केलेल्या अधर्मावर पांघरूण घालण्यासाठी त्या प्रतिज्ञा संहितेत मागाहून घुसडण्यात आल्या आहेत– असे साधार दाखवता येते (लेखास जोडलेले परिशिष्ट पाहा). एवढेच नव्हे, तर त्या प्रतिज्ञा लक्षात घेऊन दुर्योधन व भीम ह्यांच्यामधले गदायुद्ध वाचू लागल्यास त्यात अनेक विसंगती निर्माण होतात. उलट, भीमाच्या त्या प्रतिज्ञांकडे दुर्लक्ष केल्यास त्या गदायुद्धाला सुसंगती येते. ह्या साऱ्याचा परिणाम असा, की गदायुद्धावर लेख लिहिण्याचे दोन पर्याय आमच्यापुढे उभे राहिले : एक तर, भीमाच्या त्या दोन्ही प्रतिज्ञा कथेचा भाग नाहीत असे धरून लेख लिहायचा, आणि संशोधित आवृत्तीत त्या प्रतिज्ञांचा कोठे उल्लेख आहे ती माहिती परिशिष्टात द्यायची; नाही तर, त्या दोन्ही प्रतिज्ञा कथेचा भाग आहेत

अनुक्रमणिका

असे धरून लेख लिहायचा; आणि तसे धरल्याने, घडत असलेल्या प्रसंगात कोठे विसंगती निर्माण होतात, ते परिशिष्टात सांगायचे. बऱ्याच विचारांती आम्ही दुसरा पर्याय स्वीकारला आहे. गदायुद्धातल्या विसंगतींकडे दुर्लक्ष करून लेख लिहिणे, हादेखील एक पर्याय होता. तथापि, त्याने वाचकाची दिशाभूल केल्यासारखे होईल असे वाटून, तो पर्याय आम्ही टाळला आहे. गदायुद्धातल्या विसंगतींविषयी माहिती दिल्यास, महाभारताच्या संहितेतल्या प्रक्षेपांविषयी, आणि तदनुषंगाने चाललेल्या संशोधनाविषयी वाचकाला–थोडी का होईना–कल्पना येईल; हादेखील तो पर्याय टाळण्यामागचा आमचा एक हेतू आहे.

* * *

## पार्श्वभूमी

कौरव-पांडवांमधल्या युद्धाच्या अठराव्या दिवशी सकाळी युधिष्ठिर शल्याचा वध करतो आणि त्या दुपारी पांडवसेना उरल्यासुरल्या कौरवसेनेला कापून काढते. युद्धात आपला पराजय झाल्याचे दिसल्यावर दुर्योधनाचा धीर खचतो आणि युद्धभूमीवरून पळून जाऊन तो द्वैपायन नावाच्या एका जवळच्या सरोवराचे पाणी मायेने गोठवून त्यात लपतो. काही वेळाने, तो कोठे लपला आहे ते पांडवांना दैववशात कळते आणि त्या वेळी शिल्लक असलेली सारी पांडवसेना सरोवराकाठी त्वरेने येऊन ठेपते. तथापि, तेथे पोहोचल्यावर त्यांना असे दिसते, की त्या मायेने गोठवलेल्या पाण्यातून दुर्योधन जोवर स्वतः होऊन बाहेर येत नाही, तोवर त्याला कोठल्याही प्रकारे इजा करणे शक्य नाही. मग रणातून पळून गेल्यावरून युधिष्ठिर दुर्योधनाची सपाटून गर्हणा करतो आणि त्याला युद्धाचे आव्हान देतो. 'आपण सारे विश्रांती घेऊन मग युद्ध करू या', असे दुर्योधन म्हणून बघतो. पण दुर्योधन काहीतरी कारण काढून युद्ध उद्यावर ढकलतो आहे, हे युधिष्ठिराला उमगते; आणि हाती सापडलेल्या दुर्योधनाला आता जिवंत सोडायचा नाही, असा निश्चय केलेला युधिष्ठिर त्याला सरोवरातून बाहेर येऊन क्षात्रधर्माप्रमाणे लढायला उभे राहण्याचे पुन्हा आव्हान देतो. विश्रांती ही आपली सबब युधिष्ठिर मानायला तयार नाही, हे दिसल्यावर दुर्योधन एक वेगळाच विचार युधिष्ठिरासमोर मांडतो. तो म्हणतो, की आता आणखी युद्ध करायचे काही कारण उरलेले नाही. मला आता राज्य करण्याची इच्छा नाही. तू ते घेऊन टाक. मला आता जगण्यात काही रस राहिलेला नाही. मी मृगचर्मे घालून वनात निघून जाईन.

अनुद्यूतात आपण पांडवांना काय केले होते, ते दुर्योधनाला येथे आठवलेले दिसते; आणि तुम्ही मला आता तेच केल्यावर तुमचा माझ्यावरचा सूड उगवून झाल्याचे मानता येते, हा त्याचा भाव दिसतो. 'मला जीवदान दे', हे शब्द दुर्योधनाच्या तोंडी नाहीत. तथापि, जन्मभर तोऱ्यात जगल्यावर आता त्याच्या जन्मवैऱ्यांजवळ जीवदान मागण्याच्या जेवढे जवळ जाणे त्याला शक्य होते, तेवढा तो गेला आहे. दुर्योधनाच्या आयुष्यातला हा क्षण त्याच्या नावाला काळिमा लावणारा असून, एक योद्धा म्हणून हा त्याच्या आयुष्यातला अधोबिंदू आहे.

थोड्या आडवळणाने का असेना, दुर्योधन आपल्याजवळ जीवदान मागतो आहे, हे युधिष्ठिराला स्पष्ट आहे. तथापि, अजातशत्रू म्हणून प्रख्यात असलेल्या युधिष्ठिराचे मन त्याने जराही द्रवत नाही. उलट, दुर्योधनाचे ते भाषण ऐकून युधिष्ठिराच्या शब्दांना आता अधिक धार चढते. 'तू लाख मला आता राज्य द्यायला तयार असशील, पण तू दान केलेले राज्य मला नको आहे', असे सांगून, आणि 'क्षत्रियांनी दान स्वीकारायचे नसते', हा धर्मदंडक उद्धृत करून युधिष्ठिर दुर्योधनाचे ते म्हणणेही धुडकावून लावतो (९.३०.५१-५४). त्यानंतर, दुर्योधनाने पांडवांवर पूर्वी केलेल्या अपकारांचा पाढा वाचून दाखवून युधिष्ठिर त्याला युद्धाचे पुन्हा आव्हान देतो. इतर सारे पांडवही मग युधिष्ठिराची री ओढून दुर्योधनाची यथेच्छ नालस्ती करतात.

जात्याच मानी असलेल्या दुर्योधनाला त्याचे जन्मवैरी करत असलेली ती नालस्ती, आणि ते पुनःपुनः देत असलेली ती युद्धाची आव्हाने शेवटी असह्य होतात आणि तो एका अटीवर सरोवरातून बाहेर येऊन युद्धाला उभे राहण्याचे कबूल करतो. ती अट अशी : दुर्योधन सरोवरातून बाहेर येताच त्याला गराडा घालून त्याच्यावर पांडवांनी सामुदायिक हल्ला करायचा नाही; एका वेळी एक अशा प्रकारे त्या सर्वांनी त्याच्याशी द्वंद्वयुद्धे करायची. ह्या अटीवर तर ह्या अटीवर, पण दुर्योधन आता युद्धाला उभा राहायला तयार असल्याचे पाहून युधिष्ठिर त्या

अटीला होकार देतो.

पांडवपक्षाच्या दृष्टिकोनातून पाहता येथवर सारे सुरळीत चालले होते. कौरवसेना नामशेष झाल्याने युद्ध पांडवांनी जिंकल्यात जमा होऊन कुरुराज्य त्यांच्या हाती आले होते. तसेच, एकाकी पडलेला दुर्योधन त्यांच्या हाती सापडला होता. युद्धाची सांगता म्हणून त्याला आता मारले की झाले, एवढ्यावर सारे आले होते. पण दुर्योधनाने मागिलेल्या अटीला होकार देण्यावर युधिष्ठिराला थांबता येत नाही. युधिष्ठिरातला जुगारी[२] आता त्याच्या नकळत जागा झाला होता म्हणूनच म्हणा किंवा दुसऱ्या कोठल्या कारणाने म्हणा, दुर्योधनाने न मागितलेल्या दोन गोष्टीही युधिष्ठिर आता स्वतः होऊन कबूल करतो. त्यांतली पहिली गोष्ट अशी : दुर्योधनाशी घडायची द्वंद्वयुद्धे तो म्हणेल त्या शस्त्राने होतील. युधिष्ठिराचे म्हणणे ऐकल्यावर दुर्योधन सरोवराबाहेर येतो आणि द्वंद्वयुद्धांसाठी गदा हे शस्त्र निवडतो. आतापर्यंत पांडवांच्या बाजूला झुकलेले पारडे येथे दुर्योधनाच्या बाजूला झुकते. कारण, दुर्योधनाला सर्व शस्त्रांनी लढता येत असले, तरी गदा हे त्याचे सर्वांत आवडते शस्त्र होते; एवढेच नव्हे, तर द्यूतात पारंगत असा जसा शकुनीचा लौकिक होता, तसाच गदायुद्धात पारंगत असा दुर्योधनाचा लौकिक होता. शस्त्र निवडायची मुभा देण्यावर न थांबता थोड्या वेळाने युधिष्ठिराने दुर्योधनाला स्वतः होऊन कबूल केलेली दुसरी गोष्ट अशी : 'आम्हा पाच पांडवांपैकी तुला हवे त्याच्याशी तू गदायुद्ध कर आणि त्यात तू जिंकलास तर कुरुराज्य तुझे!' (९.३१.५१-५५). दुर्योधन जिंकला तर सारे युद्ध संपेल, हे युधिष्ठिराच्या म्हणण्यात अध्याहृत आहे. अवदसा आठवणे म्हणतात ती ही! कारण, प्रस्तुत प्रसंगी कृष्णाने पुढे म्हटले आहे तसे, एक भीम सोडला तर गदायुद्धात दुर्योधन कोठल्याही पांडवाला हातोहात लोळवेल हे उघड होते; आणि खुद्द भीमही जर धर्माला धरून लढला, तर तो दुर्योधनापुढे कितपत टिकेल, हा संशयच होता.

दुर्योधनाच्या मते गदायुद्धात सारेच पांडव त्याच्यापुढे किस झाड की पत्ती होते. तसेच, पळपुट्या आणि भेकड म्हणून पांडवांकडून मोठा अपमानित झालेला दुर्योधन आता स्वतःला सावरू पाहत होता. तो 'तुम्हा भावांपैकी कोणीही एकाने माझ्याशी गदायुद्धास या,' असे पांडवांना सांगतो आणि, त्याच्या अपेक्षेप्रमाणे, पांडवांतर्फे भीम गदायुद्धाला पुढे येतो.

अठरा दिवसांच्या भगीरथ प्रयत्नांती जवळपास हाती आलेले राज्य युधिष्ठिर अशा प्रकारे एका द्वंद्वयुद्धाच्या निष्पत्तीवर पणाला लावतो; आणि 'गदायुद्धे न मे कश्चित्सदृशोऽस्ति'—गदायुद्धात माझ्या तोडीचा कोणी (साऱ्या जगात) नाही–अशा गर्जना करत दुर्योधन युद्धाला उभा राहतो.

गदायुद्धाला पार्श्वभूमी म्हणून आवश्यक असलेली माहिती देऊन झाली. आता आपण व्यासांनी रचलेल्या त्या चित्तथरारक गदायुद्धाकडे वळू या.

* * *

**आव्हान आणि प्रत्याव्हान**

युधिष्ठिर व दुर्योधन ह्यांच्यामधले संभाषण घडत असताना कृष्ण युधिष्ठिराशेजारी उभा होता. दुर्योधनाला सरोवरातून बाहेर काढण्याच्या प्रयत्नात युधिष्ठिर वाहवून जाऊन भलत्या गोष्टी विनाकारण कबूल करेल, हे कृष्णाच्या ध्यानीमनीही आले नव्हते. संजय सांगतो,

एवं दुर्योधने राजन्गर्जमाने मुहुर्मुहुः।
युधिष्ठिरस्य संक्रुद्धो वासुदेवोऽब्रवीदिदम्।।९.३२.१

– राजा, ('गदायुद्धात माझ्या तोडीचा कोणी साऱ्या जगात नाही') अशा प्रकारच्या गर्जना दुर्योधन (एकीकडे) पुनः-पुनः करत असताना (दुसरीकडे) वासुदेव युधिष्ठिराला अतिशय संतापून म्हणाला....

संहितेत कृष्णाचे भाषण, दुर्योधन व युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये नुकत्याच घडून गेलेल्या संवादानंतर दिले आहे. तथापि, कृष्णाच्या भाषणातल्या तपशिलांकडे पाहता असे दिसते, की कथेतल्या वास्तवात त्या भाषणाला सुरुवात, युधिष्ठिराने दुर्योधनाला 'आम्हा पाच पांडवांपैकी तुला हवे त्याच्याशी तू गदायुद्ध कर आणि त्यात तू जिंकलास तर कुरुराज्य तुझे!' हे म्हटल्यावर लगेच झाली आहे. तसेच कृष्णाच्या भाषणाचा शेवट, दुर्योधनाने पांडवांना 'तुम्हा भावांपैकी कोणीही एकाने माझ्याशी गदायुद्धास या,' हे सांगण्यापूर्वी काही क्षण झाला असून त्यानंतर पांडवांनी भीमाला दुर्योधनाचा प्रतिद्वंद्वी म्हणून निवडला आहे. प्रस्तुत प्रसंगाच्या रचनेत असे अध्याहृत

आहे, की पांडवपक्षातल्या सर्वांसारखा दुर्योधनही आता सरोवराकाठी उभा असला, तरी तो पांडवाग्रणींपासून थोडा दूर एकटा उभा आहे, आणि पांडवाग्रणींमध्ये आता घडणार असलेली संभाषणे त्याच्यापर्यंत पोचलेली नाहीत.

कृष्ण युधिष्ठिराशी आता कशा प्रकारे बोलतो आहे ते वर्णिण्यासाठी संजयाने वापरलेला 'संक्रुद्ध' – अतिशय संतापून – हा शब्द टिपण्यासारखा आहे. कृष्ण युधिष्ठिराशी कथेत इतरत्र कोठेही संतापून बोललेला नाही हे लक्षात घेतले, की कृष्ण त्याच्यावर किती वैतागला आहे, ह्याची कल्पना येते.

कृष्ण युधिष्ठिराला म्हणतो, की आता जर का दुर्योधनाने प्रतिद्वंद्वी म्हणून तुला, अर्जुनाला, सहदेवाला किंवा नकुलाला निवडले, तर कसे काय व्हायचे? भीमाचा वध करण्याच्या इच्छेने दुर्योधनाने गेली तेरा वर्षे लोखंडी पुतळ्यावर गदायुद्धाचा सराव केला आहे, असे युधिष्ठिराला सांगून कृष्ण पुढे म्हणतो,

कथं नाम भवेत्कार्यमस्माभिर्भरतर्षभ।
साहसं कृतवांस्त्वं तु ह्यनुक्रोशान्नृपोत्तम।। ९.३२.५

–राजा, तू 'अनुक्रोशा'ने हे काय 'साहस' केलेस! भरतर्षभा, आता आपले कार्य कसे काय साधायचे?

'साहस' ह्याचा येथील अर्थ आहे, अविचार. 'अनुक्रोश' म्हणजे दया, सहानुभूती.

युधिष्ठिराच्या 'साहसा'मागे कृष्णाला खरोखरच 'अनुक्रोश' दिसला आहे, का युधिष्ठिराची आब राखण्यासाठी तो त्याच्या तोंडावर एखादा तीक्ष्ण शब्द न वापरता अनुक्रोश हा सौम्य शब्द वापरतो आहे, हा प्रश्नच आहे. (युधिष्ठिराच्या त्या वागण्याला कृष्णाने पुढे अर्जुनाजवळ वापरलेला शब्द आहे, 'अबुद्धि'- मूर्खपणा). तथापि, युधिष्ठिराने केलेल्या 'साहसा'मागे कृष्णाला खरोखरच 'अनुक्रोश' दिसला असे जरी मानले, तरी कृष्णाच्या शब्दांमध्ये स्तुती नसून भलत्या वेळी भलत्या माणसाशी 'अनुक्रोशा'ने वागल्याबद्दल ठपका आहे.

युधिष्ठिरावर 'संक्रुद्ध' झालेल्या कृष्णाला आता राहवत नाही म्हणून की काय, तो पुढल्याच क्षणी युधिष्ठिराशी परखड शब्दांमध्ये बोलू लागतो. तो म्हणतो,

तदिदं द्यूतमारब्धं पुनरेव यथा पुरा।
विषमं शकुनेश्चैव तव चैव विशां पते।।९.३२.७

–राजा, तू हे पुन्हा एकदा विषम द्यूत आरंभलेस– शकुनीच्या व तुझ्यामधल्या (पूर्वीच्या द्यूता) सारखे!

युधिष्ठिराच्या प्रस्तुत प्रसंगीच्या अविचारी वागण्या-बोलण्यात कृष्णाला काय दिसले आहे?...द्यूत! पांडवांनी चरफडत, दात-ओठ खात, मनातल्या मनात खंत करत व मोठ्या हालअपेष्टांत काढलेल्या तेरा वर्षांना कारणीभूत असलेल्या पूर्वीच्या त्या विषम द्यूतासारखेच आणखी एक विषम द्यूत!

युधिष्ठिर सद्यःप्रसंगी वाहवून गेला, हाती आलेले राज्य त्याने काही कारण नसताना पणाला लावल्यासारखे केले, आणि आता जर का हा नवा 'पण' हरून त्याने राज्य गमावले, तर त्याला युधिष्ठिर सर्वस्वी स्वतः जबाबदार असणार आहे, हे–आपल्या सर्वांसारखे– कृष्णालाही उघड आहे. तथापि, युधिष्ठिराच्या प्रस्तुत प्रसंगीच्या वागण्यात आणि कथेत पूर्वी घडून गेलेल्या द्यूताच्या वेळच्या त्याच्या वागण्यात कृष्णाला दिसलेले साम्य अर्थगर्भ आहे. त्या साम्यातून त्या पूर्वीच्या द्यूताविषयीचे कृष्णाचे खरे मत ध्वनित होते आहे. ते मत असे : त्या पूर्वीच्या प्रसंगीही युधिष्ठिराने असेच वाहवून जाऊन नको त्या गोष्टी विनाकारण पणाला लावल्या होत्या, आणि त्या गोष्टी तो त्या वेळी हरला ह्याला युधिष्ठिर स्वतः सर्वस्वी जबाबदार आहे.[३]

कृष्णाला वाटलेली काळजी, आता जर दुर्योधनाने भीम सोडून दुसऱ्या एखाद्या पांडवाला गदायुद्धासाठी निवडले, तर पांडवांचे कसे व्हायचे एवढ्याचवरून नाही. कारण, बाकी पांडव दुर्योधनाच्या तोडीचे नसले, तरी निदान आमचा भीम दुर्योधनाला भारी आहे, असले काही कृष्णाला वाटलेले नाही. भीम बलवान असला, तरी त्याला गदायुद्धाचा सराव राहिलेला नाही, दुर्योधन 'कृती'- - घटलेला, खूप सराव केलेला–आहे, आणि बलवान विरुद्ध 'कृती' ह्यांच्यामध्ये 'कृती' असलेल्याची सरशी होत असते, हे सारे युधिष्ठिराला सांगून कृष्ण पुढे म्हणतो,

वृकोदरं समासाद्य संशयो विजये हि नः।
न्यायतो युध्यमानानां कृती ह्येष महाबलः।।९.३२.१४

–(दुर्योधनाने) वृकोदराशी युद्ध केले तरीदेखील, आपण

न्यायास धरून लढल्यास आपल्या विजयाविषयी शंकाच आहे; (कारण) हा (दुर्योधन) मोठा बलबान असून 'कृती' आहे.

कृष्णाच्या शब्दांवरून असे दिसते, की 'गदायुद्धे न मे कश्चित्सदृशोऽस्ति'–गदायुद्धात माझ्या तोडीचा दुसरा कोणी (साऱ्या जगात) नाही–ह्या दुर्योधनाच्या म्हणण्यात गर्वाबरोबरच तथ्य होते.

युधिष्ठिरावर मनापासून वैतागलेला कृष्ण शेवटी स्वतःशीच बोलण्याच्या थाटात म्हणतो,

नूनं न राज्यभागेषा पाण्डोः कुन्त्याश्च संततिः।
अत्यन्तवनवासाय सृष्टा भैक्ष्याय वा पुनः।।२०२*

–खरोखर, पांडू व कुंती ह्यांची ही संतती राज्य मिळण्यासाठी (जन्माला आली) नसून अनंतकाळ वनवासासाठी, नाही तर भीक मागण्यासाठीच जन्माला आली आहे.[४]

कृष्ण हिकमती आहे. पण त्यानेही कधी नव्हे तो कपाळाला हात लावलेला दिसतो.

* * *

युधिष्ठिरावर 'संक्रुद्ध' झालेल्या कृष्णाला उत्तर युधिष्ठिराने दिले नसून भीमाने दिले आहे. भीम कृष्णाला सांगतो, की दुर्योधनाशी गदायुद्धाला मी उभा राहतो.

दुर्योधनासमोर गदायुद्धात आपल्याव्यतिरिक्त दुसऱ्या कोठल्याही पांडवाचा निभाव लागणार नाही, हे भीमाला स्पष्ट आहे. तथापि, भीम केवळ तेवढ्याच कारणाने गदायुद्धाला उभा राहतो आहे, अशातले काही नाही. भीमाशी प्राणपणाचे गदायुद्ध खेळण्याची दुर्योधनाला जशी कधीची खुमखुमी आहे, तशीच दुर्योधनाशी प्राणपणाचे गदायुद्ध खेळण्याची भीमालाही कधीची खुमखुमी आहे; आणि–गदायुद्धातल्या दुर्योधनाच्या नैपुण्याविषयी कृष्णाचे मत किती का उच्च असेना–आपण दुर्योधनाला गदायुद्धात लोळवू, असा भीमाला आत्मविश्वास आहे. तथापि, दुर्योधनाशी गदायुद्धाला उभे राहण्यामागे भीमाच्या मनात त्या साऱ्याइतकेच, किंबहुना त्या साऱ्याहूनही अधिक, महत्त्वाचे असलेले दुसरे एक कारण आहे. सूड! भीम सूडाने गेली तेरा वर्षे नुसता खदखदतो आहे, आणि दुर्योधनाने पांडवांवर आतापर्यंत केलेल्या सर्व अपकारांची परतफेड करायला तो आता हाती गदा घेऊन त्याच्या समोर उभा राहतो आहे.

भीम कृष्णाला म्हणतो,

अहं सुयोधनं संख्ये हनिष्यामि न संशयः।
विजयो वै ध्रुवं कृष्ण धर्मराजस्य दृश्यते।। ९.३२.१६

–मी सुयोधनाला रणात ठार मारेन, ह्यात संशय नाही. कृष्णा, (आज) धर्मराजाचा खचितच विजय होणार, असे (मला) दिसते आहे.

गदायुद्धासाठी दुर्योधनाचा प्रतिद्वंद्वी म्हणून भीमाला उभे राहता येणे हा, प्राप्त परिस्थितीत, पांडवांसाठी त्यातल्या त्यात इष्ट असलेला पर्याय होता. तथापि, तेवढे जुळले तर प्रश्न मिटला, असे कृष्णाचे मत उघडच नव्हते. केवळ भीमाने आता 'अहं सुयोधनं संख्ये हनिष्यामि न संशयः' म्हटल्याचे ऐकून कृष्णाच्या मतात बदल घडला आहे, असे नाही. तथापि, झाले ते होऊन गेले आणि आपण संतापणे हा त्यावर इलाज नाही हे जाणवून की काय, कृष्ण आता ते सारे बाजूला सारतो आणि 'हृष्ट'–आनंदित–होऊन भीमाला म्हणतो, की तू दुर्योधनाला नक्कीच हरवशील आणि दुर्योधनाच्या मांड्या फोडून स्वतःची प्रतिज्ञा पार पाडशील.

भीमाच्या त्या प्रतिज्ञेच्या कृष्णाने केलेल्या चार उल्लेखांपैकी पहिला उल्लेख येथे आहे.

भीमाला उत्तेजन देण्याबरोबरच कृष्ण त्याला सावध राहण्याची सूचनाही करतो. कृष्ण म्हणतो,

यत्नेन तु सदा पार्थ योद्धव्यो धृतराष्ट्रजः।
कृती च बलवांश्चैव युद्धशौण्डश्च नित्यदा।।
९.३२.२५

– पार्था, दुर्योधनाशी सदोदित सावधपणे युद्ध कर. तो कृती व बलवान आहे आणि तो नेहमी उत्तम युद्ध करतो.

कृष्णाच्या भाषणानंतर तेथे असलेले इतरही सर्वजण भीमाची प्रशंसा करतात. त्यानंतर, मी त्या पुरुषाधमाला आता ठार मारतो असे युधिष्ठिराला आश्वासन देऊन भीम दुर्योधनाला सामोरा जातो आणि कथेचा ओघ त्यांच्यामधल्या गदायुद्धाकडे वळतो.

दुर्योधन व भीम हे दोघे आता गदायुद्धासाठी सामोरे आले असले, तरी त्यांच्यामधल्या युद्धाला लगेच प्रारंभ झालेला नाही. प्रथम त्यांच्यामध्ये जहरी शब्दांमध्ये वाग्युद्ध

–शाब्दिक युद्ध–घडले असून त्यांनी एकमेकांना सणसणीत आव्हाने दिली आहेत.

वाग्युद्धाला सुरुवात भीमाने केली आहे. लाक्षागृहदाह, द्यूत, द्रौपदीची विटंबना ह्या दुर्योधनाच्या दुष्कृत्यांची त्याला आठवण करून देऊन आणि तुझ्या पक्षातले एवढे सारे योद्धे तुझ्या करणीनेच मारले गेले आहेत हे सांगून भीम पुढे म्हणतो,

अवशिष्टस्त्वमेवैकः कुलघ्नोऽधमपूरुषः।
वामप्यद्य हनिष्यामि गदया नात्र संशयः।।९.३२.४४
अद्य तेऽहं रणे दर्पं सर्वं नाशयिता नृप।
राज्याशां विपुलां राजन्पाण्डवेषु च दुष्कृतम्।। ९.३२.४५

–तूच एक कुलघ्न नराधम शिल्लक उरला आहेस. तुलाही मी आता गदेने ठार मारेन, ह्यात काही संशय नाही. राजा, रणात मी आज तुझी सारी घमेंड उतरवतो; आणि राज्याविषयीची तुझी मोठी इच्छा व तू पांडवांना केलेली दुष्कृत्ये ह्यांचा विनाश करतो.

भीमाचे आव्हान येथे संपते.

दुर्योधनाचे प्रत्याव्हान भीमाच्या आव्हानाइतकेच–किंबहुना, त्याहून अधिक–सणसणीत आहे. दुर्योधन म्हणतो,

किं कत्थितेन बहुधा युध्यस्वाद्य मया सह।
अद्य तेऽहं विनेष्यामि युद्धश्रद्धां वृकोदर।। ९.३२.४६

–अरे, एवढ्या साऱ्या बढाया का मारतो आहेस? (ये), माझ्याशी आता युद्ध कर. वृकोदरा, आज मी तुझी (सारी) युद्धश्रद्धा नष्ट करतो.

दुर्योधनाचा भाव असा : मी तुला आता ठार तर मारतोच; पण ते करण्यापूर्वी प्रथम तुझी युद्धश्रद्धा–आपल्याला फार युद्ध करता येते असा तुझा स्वतःविषयीचा भ्रम– मी दूर करतो. स्वतःच्या बळाविषयी मोठा गर्व असलेल्या भीमाला दुर्योधन पुढे म्हणतो,

मा वृथा गर्ज कौन्तेय शारदाभ्रमिवाजलम्।
दर्शयस्व बलं युद्धे यावत्तत्तेऽद्य विद्यते।।९.३२.४९

–कौंतेया, शरद ऋतूतल्या निर्जल मेघासारखा व्यर्थ गर्जना करू नकोस. तुझ्यात जेवढे काही बळ आहे, ते सारे आता युद्धात दाखव.

दुर्योधनाचे प्रत्याव्हान येथे संपते आणि बत्तिसावा अध्यायही संपतो.

दुर्योधन व भीम ह्यांच्यामधल्या वाग्युद्धाच्या प्रारंभीच पांडवसेनेतले सर्वजण, त्या दोघांमधल्या गदायुद्धाला प्रेक्षक म्हणून त्यांच्या सभोवती खाली बसले होते. वाग्युद्ध संपले आणि गदायुद्धाला प्रारंभ होणार, तेवढ्यात कौरव व पांडव ह्यांच्यात युद्ध घडणार हे दिसल्यावर त्यात कोठल्याच बाजूने भाग न घेता तीर्थयात्रेला निघून गेलेला बलराम तेथे उपस्थित होतो. दुर्योधन व भीम ह्या दोघांनीही गदायुद्धाचे शिक्षण बलरामाकडून घेतले होते. आपले दोन शिष्य आता गदायुद्धासाठी सामोरे येत आहेत हे नारदाकडून कळल्यावर ते युद्ध पाहण्यास तो तातडीने येथे आला आहे.

बलराम आल्याचे पाहून सर्वांनी त्याचे यथायोग्य स्वागत केले. बलरामानेही त्या सर्वांची विचारपूस केली. त्यानंतर, समन्तपञ्चक नावाच्या जवळच्याच एका ठिकाणाची महती बलरामाकडून ऐकल्यावर ते सर्वजण समन्तपञ्चकास गेले आणि गदायुद्ध पाहण्यासाठी दुर्योधन व भीम ह्यांच्या सभोवती खाली बसले. संजय सांगतो,

ततस्तयोः संनिपातस्तुमुलो रोमहर्षणः।
आसीदन्तकरो राजन्वैरस्य तव पुत्रयोः।।९.३३.१८

–राजा, त्यानंतर तुझ्या त्या दोन पुत्रांमध्ये तुमुल, रोमहर्षक व वैराचा अंत करणारा संग्राम सुरू झाला.

येथे तेहेतिसावा अध्याय संपतो.

संहितेतले चौतीस ते त्रेपन्न क्रमांकाचे अध्याय वैशंपायनांच्या तोंडी असून, ते अध्याय बलरामाने केलेल्या तीर्थयात्रेच्या वर्णनाने व्यापले आहेत. त्या वर्णनाचा कौरव-पांडवांच्या कथेशी काही संबंध नाही. तसेच, चोपन्न व पंचावन्न क्रमांकाच्या अध्यायांमध्ये गदायुद्धाला पुन्हा सुरुवात केली आहे. हे सारे अध्याय वरवर चाळले, तरी ते संहितेत मागाहून घातले आहेत, हे उघड दिसते.

* * *

## गदायुद्ध

दुर्योधन व भीम ह्यांच्यामधल्या गदायुद्धाचे वर्णन संहितेत छपन्न व सत्तावन्न क्रमांकांच्या अध्यायांमध्ये आले आहे. कौरव-पांडवांमध्ये घडलेल्या प्रदीर्घ व सर्वंकष युद्धाचा शेवट म्हणून, त्या दोन पक्षांतल्या सर्वोत्तम गदाधरांमध्ये मोठ्या त्वेषाने व अहमहमिकेने घडलेले हे प्राणांतिक गदायुद्ध हा महाभारतातल्या युद्धपर्वांचा कळस

आहे. आघात-प्रत्याघातांनी भरलेले हे गदायुद्ध व्यासांनी मोठे सुरेख रचले असून तेवढ्याच सुरेख भाषेत मांडले आहे.

दुर्योधन व भीम ह्यांच्यामधल्या गदायुद्धाकडे वळण्यापूर्वी प्रथम, गदायुद्धाचे नियम व स्वरूप ह्यांविषयी दोन शब्द.

गदायुद्धाविषयी लक्षात घेण्यासारखी मुख्य गोष्ट अशी, की ते युद्ध म्हणजे गदा वापरून प्रतिद्वंद्व्याला कोठल्याही प्रकारे ठेचून काढणे हे नव्हे. त्या युद्धाला सर्वमान्य व अनुल्लंघनीय असे दोन नियम होते. पहिला नियम म्हणजे, प्रतिद्वंद्व्यावर कोठल्याही परिस्थितीत कोठल्याही कारणाने नाभीखाली प्रहार करायचा नाही. दुसरा नियम म्हणजे, प्रतिद्वंद्वी बेशुद्ध अवस्थेत जमिनीवर पडला असल्यास त्या वेळी त्याच्यावर प्रहार करायचा नाही. हे दोन नियम सोडून गदायुद्धाला आणखी काही बंधने होती, असे दिसत नाही.

युद्धाच्या संदर्भात प्रथमदर्शनी विचित्र वाटल्या, तरी गदायुद्धात नियमबाह्य नसणाऱ्या दोन गोष्टींचा उल्लेख करणे योग्य ठरेल. गदा हातात धरून ठेवून तिने प्रतिद्वंद्व्यावर प्रहार करणे, हा गदाप्रहाराचा मुख्य प्रकार आहे. तथापि, गदा गरागरा फिरवून तिला पुरेसा संवेग आल्यावर ती प्रतिद्वंद्व्यावर फेकणे, हादेखील गदाप्रहाराचा पुनःपुनः वापरला जाणारा एक प्रकार होता. अशा प्रकारे गदा फेकल्यावर तो गदाधर, दूर पडलेली आपली गदा धावत जाऊन पुन्हा हातात घेत असे. मध्यंतरीच्या काळात तो गदाधर–सामान्य अर्थाने–निःशस्त्र आहे व म्हणून त्याच्यावर प्रहार करणे नियमबाह्य आहे, असे वाटू शकते. तथापि, तसा प्रहार गदायुद्धात नियमबाह्य नाही. दुसरे म्हणजे, एखादा गदाधर युद्धात खाली पडला असेल आणि शुद्धीत असेल, तर त्या वेळी त्याच्यावर प्रतिद्वंद्व्याने प्रहार करणे गदायुद्धात नियमबाह्य नाही.

डावपेच म्हणून गदायुद्धात नेमके काय केले जात असे, ते कळायला आता मार्ग उरलेला नाही. असे दिसते, की प्रतिद्वंद्व्यावर वेगवेगळ्या प्रकारे चालून जाऊन त्याच्यावर नाना प्रकारचे प्रहार करणे, प्रतिद्वंद्व्यांचे प्रहार वेगवेगळ्या प्रकारच्या हालचाली करून चुकवणे, प्रतिद्वंद्व्याला असुरक्षित पवित्र्यात गाठता यावे ह्यासाठी वेगवेगळ्या हिकमती करणे, असले सारे प्रकार केले जात असत. प्रतिद्वंद्व्यावर गदा फेकणे हे भीमाचे विशेष कसब होते, आणि ते वापरून दुर्योधनावर प्रहार करण्याचे त्याने पुनःपुनः प्रयत्न केले आहेत. त्याविरुद्ध, प्रतिद्वंद्व्याचा आघात चुकवून त्यावर तत्क्षणी प्रत्याघात करणे हे दुर्योधनाचे विशेष कसब होते, आणि ते वापरून त्याने भीमावर पुनःपुनः प्रहार केले आहेत. भीमाचा भर बळावर होता, तर दुर्योधनाचा भर चपळाईवर होता. ह्यापलीकडे, दुर्योधन व भीम ह्यांनी एकमेकांवर वापरलेल्या डावपेचांविषयी अधिक माहिती संजयाच्या तोंडी असलेल्या वर्णनात नाही.

आता, कथेत सद्यःक्षणी घडत असलेले गदायुद्ध. दुर्योधन व भीम ह्यांच्यामधले वाग्युद्ध संपून ते एकमेकांवर धावून गेले येथपासून छपन्नाव्या अध्यायाला प्रारंभ होतो. संजय सांगतो,

प्रगृहीतगदौ दृष्ट्वा दुर्योधनवृकोदरौ।
संशयः सर्वभूतानां विजये समपद्यत।।९.५६.१०

–गदा हाती घेतलेले दुर्योधन व भीम ह्या दोघांकडे पाहून, ह्यांतल्या कोणाचा विजय होईल ह्याविषयी सर्व भूतमात्रांना प्रश्न पडला.

'सर्व भूतमात्रे' ह्यात तेथे सभोवती बसलेल्या पांडवसेनेबरोबरच, अंतरिक्षातून युद्ध पाहत असलेले देव, यक्ष, गंधर्व, अप्सरा इत्यादी सर्वजण समाविष्ट आहेत.

कथेत सद्यःक्षणी घडत असलेले गदायुद्ध धृतराष्ट्राच्या डोळ्यांसमोर स्पष्टपणे उभे राहावे म्हणून की काय, संजयाने त्याचे तपशीलवार वर्णन दिले असून, गदायुद्धातल्या चढाउतारांबरोबरच त्या चढउतारांविषयीच्या प्रेक्षकांच्या प्रतिक्रियाही त्याने वर्णिल्या आहेत.

गदायुद्धाला सुरुवात झाली आणि थोड्याच वेळात, दुर्योधनाने भीमावर दोन प्रहार केले. त्यानंतर भीमाने त्याच्यावर गदा फेकली, पण दुर्योधनाने ती चपळाईने चुकवली. घडत असलेल्या गदायुद्धाचा आवेग मग वाढू लागला आणि भीमाच्या मस्तकावर गदाप्रहार करण्यात दुर्योधनाला यश आले. दुर्योधनाचा तो प्रहार जबरदस्त होता; पण त्या प्रहाराने जराही न डगमगता भीमाने लगेच त्याची स्वतःची गदा ही दुर्योधनावर भिरकावली.

दुर्योधनाने चपळपणे जेव्हा ती गदा चुकवली, तेव्हा सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. स्वसंरक्षणासाठी भीमाच्या हातात आता गदा नव्हती. दुर्योधनाने ती संधी साधली आणि भीमाच्या छातीवर गदेने एक सणसणीत तडाखा दिला. दुर्योधनाच्या आधीच्या प्रहारांनी भीमाला खास काही झाले नव्हते; त्याच्या ह्या तडाख्याने मात्र भीमाला भोवळ आल्यासारखे होऊन आता पुढे काय करावे, ते त्याला काही क्षण सुचेना.

प्रेक्षक म्हणून सभोवार बसलेल्या पांचालांना व पांडवांना दिसते आहे, की भीमाचे सर्व प्रहार दुर्योधन सहजगत्या चुकवतो आहे आणि भीमावर प्रहार करण्यात दुर्योधनाला वारंवार यश येते आहे. तसेच, त्यांना हेदेखील दिसते आहे, की भीमाच्या अंगात अपार बळ असूनही दुर्योधनाच्या प्रहारांचा त्याच्यावर आता परिणाम व्हायला लागला आहे. संजय सांगतो,

तस्मिंस्तथा वर्तमाने राजन्सोमकपाण्डवाः।
भृशोपहतसंकल्पा नहृष्टमनसोऽभवन्।। ९.५६.४९

–राजा, हे असे घडल्यावर पांचाल व पांडव ह्यांचे मनोरथ पार ढासळले आणि त्यांची मने उदास झाली.

दुर्योधनाने छातीत केलेल्या प्रहाराने भीमाला भोवळ आल्यासारखे झाले होते; पण त्याचा फायदा घेऊन दुर्योधनाने त्याला आणखी काही करण्यापूर्वी भीम सावरला. मग, दूर पडलेली स्वतःची गदा त्याने हाती घेतली आणि गरागरा फिरवून ती दुर्योधनावर पुन्हा फेकली. भीमाचे सर्व प्रहार दुर्योधनाने येथवर चपळपणे चुकवले होते. त्याचा हा प्रहार मात्र दुर्योधनाच्या कुशीत लागला. भीमाचा प्रहार असा काही होता, की त्याने दुर्योधन व्याकूळ झाला आणि त्याने गुडघे जमिनीला टेकवले.

प्रेक्षक म्हणून सभोवती बसलेल्या पांचालांच्या व पांडवांच्या दृष्टीने हे गाडे शेवटी एकदाचे बरोबर दिशेने निघाले होते. संजय सांगतो,

तस्मिंस्तु भरतश्रेष्ठे जानुभ्यामवनीं गते।
उदतिष्ठत्ततो नादः सृञ्जयानां जगत्पते।।९.५६.५४

–राजा, त्या भरतश्रेष्ठाने भूमीवर गुडघे टेकवताच पांचालांमध्ये (हर्ष) नाद झाला

....शाब्बास भीमा!....वा रे पठ्या!

तथापि, दुर्योधनाच्या त्या अवस्थेचा उपयोग करून भीमाने त्याला आणखी काही करण्यापूर्वीच, पांचालांचा तो हर्षनाद ऐकून संतप्त झालेला दुर्योधन उठला; भीमाकडे त्याने खाऊ का गिळू अशा नजरेने पाहिले आणि त्याच्यावर धावून जाऊन आपली गदा त्याच्या कपाळात हाणली. दुर्योधनाचा तडाखाही असा काही जबरदस्त होता, की

स चचालाचलोपमः।।९.५६.५८

–पर्वतासारखा (अविचल) असलेला तो (भीम त्या प्रहाराने) डगमगला.

घडत असलेल्या गदायुद्धाचा आवेग आणि त्या युद्धातली ईर्ष्या ह्या दोन्ही गोष्टी आता शिगेला पोचतात. संजयाचे युद्धवर्णनही अधिक रेखीव होते. गदायुद्धातला हा भाग, (९.५६.६०-६७), त्या प्रसंगातल्या नाट्याचा मुकुटमणी आहे. (संहितेचा हा भाग वंशस्थविल वृत्तात असून त्या वृत्ताची व्याख्या आहे : ज, त, ज, र).

दुर्योधनाच्या तडाख्याने भीम डगमगला खरा; पण दुर्योधनाने आणखी काही करण्यापूर्वी तो सावरला आणि त्याने दुर्योधनाला एक असा काही तडाखा हाणला, की तो बेशुद्ध होऊन खाली कोसळला. दुर्योधन खाली कोसळल्याचे पाहून पांचालांना आणि पांडवांना आनंदाच्या उकळ्या फुटल्या. संजय सांगतो,

ततः प्रणेदुर्जहृषुश्च पांडवाः
समीक्ष्य पुत्रं पतितं क्षितौ तव।

–तेव्हा, तुझा पुत्र जमिनीवर कोसळल्याचे पाहिल्यावर पांडवांनी हर्षभरित होऊन मोठमोठ्याने आरोळ्या ठोकल्या. .... आमच्या भीमाला तडाखे मारतोस काय?....कसा हाणला!

गदायुद्धाच्या नियमांना अनुसरून, दुर्योधन बेशुद्ध पडला असताना भीमाने त्याच्यावर प्रहार केला नाही. संजय सांगतो,

ततः सुतस्ते प्रतिलभ्य चेतनां
समुत्पपात द्विरदो यथा ऱ्हदात्।।९.५६.६२

–त्यानंतर, तुझा पुत्र पुन्हा शुद्धीवर आला आणि —सरोवरातून बाहेर पडणाऱ्या हत्तीसारखा—उठून उभा राहिला.

मग गदायुद्ध पुन्हा सुरू झाले आणि...

स पार्थिवो नित्यममर्षितस्तदा महारथः शिक्षित-वत्परिभ्रमन्।

अनुक्रमणिका

अताडयत्पाण्डवमग्रतः स्थितं
स विह्वलाङ्गो जगतीमुपास्पृशत्।।९.५६.६३

-त्यानंतर, नित्य 'अमर्षी'-असहिष्णू, असहनशील-असलेल्या त्या महारथी राजाने (दुर्योधनाने) (रणात) निष्णातपणे संचार करून समोर असलेल्या पांडवावर प्रहार केला. (त्या प्रहाराने) त्याचे (भीमाचे) सर्व अंग विह्वल होऊन तो भूमीवर पडला.

स सिंहनादान्विननाद कौरवो
निपात्य भूमौ युधि भीममोजसा।
बिभेद चैवाशनितुल्यतेजसा
गदानिपातेन शरीर-रक्षणम्।।
९.५६.६४

-युद्धात मोठ्या सामर्थ्याने भीमाला भूमीवर पाडल्यावर त्या कौरवाने सिंहनाद केले आणि गदेच्या एका वज्राघातासारख्या प्रहाराने भीमाच्या अंगातले कवच फोडले.

पहिल्या गदाप्रहाराने भीम खाली पडल्यावर त्या अवस्थेत त्याला दुसरा प्रकार करण्यात दुर्योधनाचे काही चुकलेले नसून दुर्योधनाच्या दुसऱ्या गदाप्रहाराने भीमाच्या अंगातले कवच फुटण्याबरोबर भीम बेशुद्ध पडला, हे संजयाच्या तोंडी आता येत असलेल्या श्लोकांवरून उघड आहे.

संजय आता प्रेक्षकांची प्रतिक्रिया वर्णितो. प्रथम अंतरिक्षातले प्रेक्षक. संजय सांगतो,

ततोऽन्तरिक्षे निनदो महानभूद्दिवौकसामप्सरसां च नेदुषाम्।
पपात चोच्चैरमरप्रवेरितं
विचित्रपुष्पोत्करवर्षमुत्तमम्।।९.५६.६५

-तेव्हा, (हर्षाने) आरोळ्या ठोकणाऱ्या देवांमध्ये व अप्सरांमध्ये मोठा निनाद झाला आणि देवांनी उंचावरून (दुर्योधनावर) चित्रविचित्र पुष्पांची अतिशय मोठी वृष्टी केली.

दुर्योधनाच्या नैपुण्यपूर्ण प्रहाराला गगनस्थ प्रेक्षकांनी दिलेली ही दाद आहे....वा रे बहाद्दर! ह्याला म्हणतात युद्ध!

आता, तेथे सभोवार बसलेले पांचाल व पांडव ह्यांची प्रतिक्रिया. संजय सांगतो,

ततः परानाविशदुत्तमं भयं
समीक्ष्य भूमौ पतितं नरोत्तमम्।
अहीयमानं च बलेन कौरवं
निशम्य भेदं च दृढस्य वर्मणः।। ९.५६.६६

-त्या नरोत्तमाला भूमीवर पडलेला पाहून, त्याचे दृढ कवच फुटलेले पाहून, आणि कौरवाच्या अंगातले बळ (जराही) कमी न झाल्याचे पाहून (आपल्या) शत्रूंच्या मनांमध्ये अतिशय मोठी भीती शिरली.

आपल्या भीमाने दुर्योधनाला पाणी पाजण्याऐवजी दुर्योधनच त्याला पाणी पाजतो आहे हे पाहून पांचाल व पांडव ह्यांचे धाबे दणाणले आहे.

बेशुद्ध पडलेल्या दुर्योधनावर भीमाने जसा प्रहार केला नव्हता तसाच आता, बेशुद्ध पडलेल्या भीमावर दुर्योधनाने प्रहार केलेला नाही. संजय सांगतो,

ततो मुहूर्तादुपलभ्य चेतनां
प्रमृज्य वक्त्रं रुधिरार्द्र-मात्मनः। ९.५६.६७
धृतिं समालम्ब्य विवृत्तलोचनो
बलेन संस्तभ्य वृकोदरः स्थितः।।

-त्यानंतर काही वेळाने वृकोदर शुद्धीवर आला. रक्ताने माखलेले स्वतःचे तोंड त्याने पुसले. मग धैर्य एकवटून आणि, डोळे फिरत असूनही बळाचा उपयोग करून भीम स्वतःला कसेबसे सावरत उठून उभा राहिला.

वाग्युद्धात दुर्योधनाने भीमाला म्हटले होते, की आज मी तुझी 'युद्धश्रद्धा' नष्ट करतो. भीम आता गदायुद्धाला पुन्हा उभा राहिला आहे खरा; पण गदायुद्धात पुढे घडलेल्या गोष्टींवरून हे उघड आहे, की दुर्योधनाने भीमाची 'युद्धश्रद्धा' येथे खरोखरच नष्ट केली. येथे छपन्नावा अध्याय संपतो.

* * *

दुर्योधन व भीम ह्यांच्यामधले गदायुद्ध येथवर धर्माला धरून घडत होते. आता कृष्ण त्यात-अप्रत्यक्षपणे का असेना-हस्तक्षेप करतो आणि त्या गदायुद्धाचे स्वरूप पालटते.

कृष्णाचा हस्तक्षेप संजयाने सत्तावन्नाव्या अध्यायाच्या पूर्वार्धात वर्णिला आहे. अध्यायाची सुरुवात, सद्यःक्षणी घडत असलेल्या गदायुद्धाविषयी अर्जुनाने कृष्णाला विचारलेल्या प्रश्नाने झाली आहे. अर्जुन विचारतो, 'ह्या

दोघा वीरांपैकी तुझ्या मते गदायुद्धात कोण वरचढ आहे आणि कोणामध्ये कोठला गुण अधिक आहे, ते मला सांग.'

दुर्योधनाच्या व भीमाच्या युद्धनैपुण्यांविषयीचे कृष्णाचे तौलनिक मूल्यमापन आणि त्या दोघांमधल्या गदायुद्धाच्या भावी निष्पत्तीविषयीचे कृष्णाचे मत–किंबहुना, त्याविषयीची कृष्णाची धास्ती–हे सारे कृष्णाने युधिष्ठिराला थोड्या वेळापूर्वी सांगितले होते आणि तेव्हा ते अर्जुनानेही ऐकले होते. तथापि, कृष्णाचे ते मत, त्याला त्या दोघांमधले गदायुद्ध प्रत्यक्षात पाहण्याची संधी मिळण्यापूर्वीचे होते. अर्जुन कृष्णाला येथे वेगळ्या शब्दांमध्ये विचारतो आहे, की ह्या दोघांमधले गदायुद्ध इतक्या वेळ पाहिल्यावर त्या साऱ्याविषयी तुझे आता काय म्हणणे आहे?

गदायुद्ध प्रत्यक्षात पाहूनही, दुर्योधन व भीम ह्यांच्या युद्धनैपुण्यांविषयीच्या कृष्णाच्या तौलनिक मूल्यमापनात बदल झालेला नाही. बदल झाला आहे तो त्यांच्यामधल्या गदायुद्धाच्या निष्पत्तीविषयी. दुर्योधनाच्या हातून भीमाचा मृत्यू ही ती निष्पत्ती असेल अशी कृष्णाला आधी जरी धास्ती वाटली होती, तरी तसे घडेलच अशी त्याला खात्री वाटली नव्हती. आता, गदायुद्धात दुर्योधनाची सरशी होते आहे एवढेच नव्हे, तर दुर्योधनाने भीमाच्या अंगातले कवच फोडल्याने भीमाची बाजू लंगडी झाली आहे हे पाहिल्यावर, हे गदायुद्ध असेच चालू दिले तर भीम दुर्योधनाच्या हातून लवकरच मारला जाणार आहे, ह्याविषयी कृष्णाच्या मनात तिळमात्र संशय उरलेला नाही.

अर्जुनाच्या प्रश्नाला उत्तर म्हणून कृष्ण त्याला प्रथम सांगतो, की भीमात बळ जास्त असले, तरी दुर्योधन 'कृती'–घटलेला–आहे. त्यानंतर, घडत असलेल्या गदायुद्धाच्या निष्पत्तीकडे वळून कृष्ण म्हणतो,

भीमसेनस्तु धर्मेण युध्यमानो न जेष्यति।

–जर भीमसेन (असाच) धर्माने लढत राहिला, तर तो जिंकणार नाही. भीम आणि दुर्योधन ह्यांच्यापैकी एकाच्या मृत्यूने संपणार असलेल्या ह्या गदायुद्धात 'जिंकणार नाही' ह्याचाच अर्थ 'ठार मारला जाणार आहे,' हा आहे. अर्थातच, कृष्ण नुसते 'जिंकणार नाही' एवढे सांगून थांबत नाही. आपल्या पक्षाने युद्धात सदोदित धर्माला धरूनच वागायला हवे, असे मानत नसलेला कृष्ण[६] अर्जुनाला पुढे म्हणतो,

अन्यायेन तु युध्यन्वै हन्यादेष सुयोधनम्।।९.५७.४

-तथापि, अन्याय्य मार्गाने लढून तो सुयोधनाला मारू शकेल.

कृष्णाच्या तोंडच्या 'हन्यात्' ह्यातून शक्यतेबरोबर अपेक्षा, सूचना, आज्ञा हे भावही ध्वनित झाले आहेत.

कृष्णाने अर्जुनाला युद्धात अनेक प्रसंगी सूचना केल्या आहेत. त्यांपैकी, तो आता करतो आहे ती धर्माला धरून नसलेली पहिलीच सूचना नाही. 'जो धर्म नाही तो अधर्म' असे आपल्याला वाटू शकते. तथापि, धर्माला धरून नसलेल्या स्वतःच्या सूचनांना कृष्ण अधर्म म्हणत नसतो. असे दिसते, की जो अगदी शुद्ध धर्म नाही पण अगदी निंद्य अधर्मही नाही, असे एक वेगळेच सदर असल्याचा कृष्णाने शोध लावला आहे आणि तो आता सुचवत असलेला 'अन्याय' ही त्या सदरात बसणाऱ्या अनेक गोष्टींपैकी एक गोष्ट आहे.

भीमाने 'अन्याया'ने लढायला हवे, हे सुचवणे ठीक आहे. तथापि, भीमाला पाणी पाजत असलेल्या ह्या 'कृती' गदाधराशी भीमाने 'अन्याया'ने लढायचे म्हणजे नेमके काय करायचे? कृष्णाकडे ह्या प्रश्नाला उत्तर आहे. दुर्योधनाच्या मांड्यां फोडण्याविषयीच्या भीमाच्या प्रतिज्ञेचा (दुसऱ्यांदा) उल्लेख करून कृष्ण अर्जुनाला सांगतो, की भीमाने ती प्रतिज्ञा आता पार पाडावी.

भीमाने 'अन्याय' वापरण्याची आवश्यकता अर्जुनाच्या मनावर ठसवण्यासाठी कृष्ण त्याला पुन्हा सांगतो, की

यद्येष बलामास्थाय न्यायेन प्रहरिष्यति।
विषमस्थस्ततो राजा भविष्यति युधिष्ठिरः।।९.५७.८

–जर का भीम केवळ बलाचा उपयोग करून न्याय्य मार्गाने लढत राहिला, तर युधिष्ठिरावर मोठा प्रसंग ओढवणार आहे.

पांडवपक्षावर ओढवलेल्या प्रस्तुत अरिष्टाला कोण कारणीभूत होते ह्यावर काही बोलण्याला आता, खरे तर, काही अर्थ नव्हता. पण, युधिष्ठिराचे नाव निघाल्यावर, त्याने केलेल्या 'साहसा' विषयी बोलल्यावाचून कृष्णाला राहवत नाही. त्या विषयावर युधिष्ठिराशी आधी बोलताना कृष्णाने वापरलेले शब्द कमी स्पष्ट किंवा

कमी कडवट होते, असे नाही. तथापि, त्यासाठी तो आता वापरात असलेले शब्द अधिक स्पष्ट, अधिक तीक्ष्ण आणि अधिक कडवट आहेत. युद्धात येथवर मिळवलेले सारेकाही युधिष्ठिराने पाण्यात घातले आहे, एवढेच नाही तर त्याने आपल्याला मोठ्या संकटात पाडले आहे, हे सांगून झाल्यावर कृष्ण पुढे म्हणतो,

अबुद्धिरेषा महती धर्मराजस्य पाण्डव।
यदेकविजये युद्धं पणितं कृतमीदृशम्।
सुयोधनः कृती वीर एकायनगतस्तथा।।९.५७.११

–पांडवा, अशा प्रकारे एका (द्वंद्वयुद्धातल्या) विजयावर सबंध युद्ध पणाला लावण्यात धर्मराजाचा मोठा मूर्खपणा झाला आहे. सुयोधन 'कृती' व वीर असून आता (जिंकायचे एवढ्या) एकाच गोष्टीवर त्याने चित्त एकाग्र केले आहे.

पराभूत झालेला दुर्योधन चांगला राज्यावरचा हक्क सोडून वनात जायला निघाला होता ह्याचा उल्लेख करून कृष्ण म्हणतो,

को न्वेष संयुगे प्राज्ञः पुनर्द्वंद्वे समाह्वयेत्।
अपि वो निर्जितं राज्यं न हरेत सुयोधनः।।९.५७.१५

– (अशा परिस्थितीत) कोण प्राज्ञ माणूस त्याला रणात द्वंद्वासाठी आव्हान देईल बरे? तुम्ही (युद्धात) जिंकलेले राज्य सुयोधनाने आता (तुमच्याकडून) हरण केले नाही म्हणजे झाले!

युधिष्ठिराशी सरोवरातून बोलताना दुर्योधन राज्यावरचा हक्क सोडून वनात जायला तयार झाला होता आणि युधिष्ठिराने तेव्हा त्याला मोठ्या तोंडाने क्षात्रधर्म सुनावून युद्धाचे आव्हान दिले होते. कृष्णाच्या वरील उद्‌गारांवरून असे दिसते, की कृष्णाच्या मते, युधिष्ठिराने त्या वेळी दान, क्षात्र धर्म वगैरे निमित्ते काढून दुर्योधनाला युद्धाला उभे राहण्यास भाग पाडण्याऐवजी वनात जाऊ द्यायला हवे होते.

युधिष्ठिराचे 'साहस' आणि त्याची 'अबुद्धी' हा विषय संपवून कृष्ण शेवटी सद्यःपरिस्थितीवर येतो. तो अर्जुनाला म्हणतो,

एवं चेन्न महाबाहुरन्यायेन हनिष्यति।
एष वः कौरवो राजा धार्तराष्ट्रो भविष्यति।।
९.५७.१७

–जर ह्या महाबाहूने (भीमाने) अशा प्रकारे 'अन्याया' ने ह्याला ठार मारले नाही, तर हा धार्तराष्ट्र कौरव तुमचा राजा होईल.

'एवम्'–अशा प्रकारे–ह्यात कृष्णाला, त्याने अर्जुनाला आधी सुचवलेला मार्ग अभिप्रेत आहे. तो मार्ग म्हणजे, भीमाने दुर्योधनाच्या मांड्या फोडणे. कृष्णाचे भाषण येथे संपते व गदायुद्धातला त्याचा हस्तक्षेपही संपतो.

धर्म धर्म करत द्यूतातला पराजय पदरी घेतल्यावर, आणि धर्म धर्म करत बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास भोगल्यावर अर्जुनाची आता धर्मासाठी पुन्हा पराजय पदरी घ्यायची तयारी दिसत नाही. संजय सांगतो,

धनंजयस्तु श्रुत्वैतत्केशवस्य महात्मनः।
प्रेक्षतो भीमसेनस्य हस्तेनोरुमताडयत्।।९.५७.१८

–महात्म्या केशवाचे ते म्हणणे ऐकून अर्जुनाने, भीमाला दिसेल अशी (स्वतःच्या) मांडीवर थाप मारली.

अर्जुन व कृष्ण ह्यांच्यामधला हा संवाद बलराम व युधिष्ठिर ह्यांना ऐकू गेलेला नाही आणि अर्जुनाने भीमाला केलेली खूण त्या दोघांना दिसलेली नाही, हे कथेत येथे अध्याहृत आहे.

* * *

कृष्ण व अर्जुन ह्यांच्यामधला वरील संवाद घडत असताना दुर्योधन व भीम ह्यांच्यामधले–भीम बेशुद्ध पडला म्हणून तात्पुरते थांबलेले–गदायुद्ध पुन्हा सुरू झाले होते. अर्जुनाने स्वतःच्या मांडीवर मारलेली थाप, गदायुद्धात गुंतलेल्या भीमाने पाहिली एवढेच नव्हे, तर त्याला त्या खुणेचा अर्थ उमगला; आणि त्यानुसार तो आता डावपेच लढवू लागला.[७]

त्यानंतर त्या दोघांमध्ये अटीतटीचे द्वंद्व बराच वेळ चालू राहिले. त्यांनी परस्परांना बऱ्याच जखमाही केल्या. शेवटी, ते दोघेही पार थकून गेल्याने त्यांना थोडा वेळ विश्रांती घेणे भाग पडले. विश्रांती घेऊन झाल्यावर त्यांच्यातले युद्ध पुन्हा सुरू झाले आणि गदायुद्ध ह्या घटनेचा शेवटचा अंक सुरू झाला.

काही वेळाने दुर्योधनाकडून एक बारीकशी चूक झाली व त्यामुळे भीमाला त्याच्या जवळ जाऊन गदाफेक करता आली. पण, दुर्योधन अगदीच बेसावध नव्हता.







भीमाने फेकलेली गदा आपल्याकडे येते आहे असे पाहून दुर्योधन त्याच्या आधीच्या जागेवरून तत्क्षणी बाजूला सरकला आणि भीमाचा आघात विफल होऊन त्याची गदा दूर जाऊन पडली. मग भीमाने जरी लगबगीने त्याची स्वतःची गदा पुन्हा हाती घेतली, तरी ते करत असताना भीम उघडा पडला होता, आणि त्या संधीचा उपयोग करून दुर्योधनाने त्याच्यावर एक अचूक व जबरदस्त प्रहार केला. संजय सांगतो,

तस्य विष्यन्दमानेन रुधिरेणामितौजसः।
प्रहारगुरुपाताच्च मूर्च्छेव समजायत।।९.५७.३६

— अंगातून रक्त भळभळ वाहू लागल्यामुळे आणि त्या प्रबल प्रहाराच्या आघातामुळे (भीमाच्या अंगात) अपार बळ असूनही त्याला मूर्च्छा आल्यासारखे झाले.

मूर्च्छा आल्यासारखे झाले, तरी भीम शुद्धीवर होता. ही सुवर्णसंधी साधून दुर्योधनाने तत्क्षणी जर आणखी एका जबरदस्त प्रहाराने भीमाचा कपाळमोक्ष केला असता, तर ते गदायुद्धाच्या नियमांमध्ये बसले असते आणि प्रस्तुत गदायुद्ध संपून पांडव हरले असले. पण, दुर्योधनाच्या हातून आता एक घोडचूक झाली. भीमाला मूर्च्छा आल्यासारखे झाले असल्याचे त्याला उमगले नाही; उलट, भीमला खास काही झालेले नाही आणि तो आपल्यावर आता प्रत्याघात करणार आहे, असे दुर्योधनाला वाटले, आणि भीमाचा तो अपेक्षित प्रत्याघात हुकवण्याचा दृष्टीने हालचाली करण्यात त्याने वेळ वाया दवडला.

दुर्योधनाच्या त्या घोडचुकीमुळे भीमाला काही क्षण विसावा घेता आला. अशा प्रकारे स्वतःला थोडे सावरल्यावर भीम समोर उभ्या असलेल्या दुर्योधनावर वेगाने धावून गेला. भीमाच्या प्रत्याघातासाठी दुर्योधन तयारच होता. तो प्रत्याघात हुकवण्यासाठी दुर्योधनाने 'अवस्थान' हा डावपेच करून उंच उडी मारायचे मनात आणले.

प्रतिद्वंद्वयाची अपेक्षित गदाफेक हुकवण्यासाठी वापरायच्या अनेक डावपेचांपैकी 'अवस्थान' हा एक डावपेच होता असे दिसते. तथापि, तो डावपेच नेमका काय होता, आणि दुर्योधन आता मारणार असलेली उंच उडी 'अवस्थाना'चा भाग होता, का आधी 'अवस्थान' करून मग तो उडी मारणार होता, ते संजयाच्या वर्णनावरून स्पष्ट होत नाही. तथापि, कथारचनेत येथे अध्याहृत असलेली, आणि दुर्योधन व भीम ह्यांनी येथे वापरलेल्या डावपेचांमागची कारणे व भाव उमगण्यासाठी पुरेशी असलेली गोष्ट अशी : दुर्योधन आता मारणार- आहे. तशी उंच उडी मारणाऱ्याच्या मांड्या फोडणे प्रतिद्वंद्वयाला सहज शक्य असे आणि नाभीखाली प्रहार करायचा नाही ह्या गदायुद्धाच्या अनुल्लंघनीय नियमामुळेच, तशी उडी मारणे हा गदायुद्धात वापरल्या जाणाऱ्या डावपेचांचा एक भाग असे.

आपण इतक्या वेळ वाट पाहत होतो ती सुवर्णसंधी शेवटी एकदाची येऊन ठेपल्याचे भीमाला दिसते. संजय सांगतो,

अबुध्यद्भीमसेनस्तद्राज्ञस्तस्य चिकीर्षितम्।
अथास्य समभिद्रुत्य समुत्क्रम्य च सिंहवत्।।
९.५७.४२

सृत्या वञ्चयतो राजन्पुनरेवोत्पतिष्यतः।
ऊरुभ्यां प्राहिणोद्राजन्गदां वेगेन पाण्डवः।।
९.५७.४३

–तो राजा (दुर्योधन) काय करणार आहे, ते भीमाने बरोबर ताडले. त्यानंतर, त्याच्यावर धावून जाऊन (भीमाने) सिंहासारखी झेप घेतली आणि, राजा, फसवण्यासाठी बाजूला सरल्यासारखे करून मग उंच उडी मारत असलेल्या त्याच्या (दुर्योधनाच्या) मांड्यांवर त्या पांडवाने जोराने गदा फेकली.

दुर्योधनाच्या डावपेचांबद्दलचे आणि हालचालींबद्दलचे भीमाचे बहुतेक अंदाज आतापर्यंत चुकले होते. त्यामुळे त्याची गदाफेकही आतापर्यंत चुकली होती. पण सद्यःप्रसंगी, दुर्योधनाच्या हालचालींविषयीचा भीमाचा अंदाज बरोबर होता; दुर्योधन स्वतःच्या मांड्यांचे संरक्षण करणार नाही, ही त्याची अपेक्षा बरोबर होती; आणि, उंच उडी मारत असलेल्या दुर्योधनाच्या मांड्यांवर गदा नेमकी आदळेल, असा त्याने धरलेला नेमही अचूक होता. संजय सांगतो,

सा वज्रनिष्पेषसमा प्रहिता भीमकर्मणा।
ऊरू दुर्योधनस्याथ बभञ्ज प्रियदर्शनौ।।९.५७.४४

–भीमकर्मे करणाऱ्या त्याने (भीमाने) फेकलेल्या गदेच्या वज्राघातासारख्या प्रहाराने दुर्योधनाच्या सुंदर दिसणाऱ्या मांड्या फुटल्या.

मांड्या फुटल्याने धुळीत पडलेला दुर्योधन जरी लगेच मेला नसला, तरी तो आता लवकरच मरणार आहे, हे येथे अध्याहृत आहे. येथे गदायुद्ध संपते आणि सत्तावन्नावा अध्यायही संपतो.

*   *   *

**लत्ताप्रहार**

अठ्ठावन्नाव्या अध्यायाचा विषय आहे, दुर्योधनाच्या मांड्या फोडल्यावर भीमाने त्याच्या मस्तकात घातलेल्या लाथा.

आपण दुर्योधनाला धर्मबाह्य मार्गाने मारले आहे, हे भीमाला स्पष्ट आहे. तथापि, सूडाने गेली तेरा वर्षे खदखदत असलेल्या भीमाच्या वागण्या-बोलण्यामध्ये, दुर्योधनाला तसे मारण्यात आपले काही चुकले, ह्याची पुसटही दखल नाही. उलट, त्याला आपले ते कृत्य मोठे भूषणावह वाटले आहे.

द्यूतानंतर व अनुद्यूतानंतर दुर्योधनाने केलेले पांडवांचे अपमान आणि त्याने वेळोवेळी पांडवांवर केलेले अपकार हे सारे इतर पांडवांसारखे भीमाच्या मनातही ताजे होते. मांड्या फुटून धुळीत पडलेल्या दुर्योधनाला आता त्या जुन्या गोष्टींपैकी भीमाला सर्वात झोंबलेल्या गोष्टीची आठवण करून देण्यापासून भीम त्याच्याशी बोलायला सुरुवात करतो. दुर्योधनाजवळ जाऊन भीम त्याला म्हणतो,

गौर्गौरिति पुरा मन्द द्रौपदीमेकवाससम्।
सत्सभायां हसन्नस्मांस्तदा वदसि दुर्मते।
तस्यावहासस्य फलमद्य त्वं समवाप्नुहि।।९.५८.४

–अरे मंदबुद्धे! दुर्मते! पूर्वी सभेमध्ये एकवस्त्रा द्रौपदीला हसून तू आम्हाला तेव्हा 'गौर्गौः'–गाय! गाय! – असे म्हणाला होतास. त्या उपहासाचे तू आज हे फळ भोग.

संजय सांगतो,

एवमुक्त्वा स वामेन पदा मौलिमुपास्पृशत्।
शिरश्च राजसिंहस्य पादेन समलोडयत्।।९.५८.५

–असे म्हणून त्याने दुर्योधनाच्या मस्तकाला डाव्या पायाने स्पर्श केला आणि त्या राजसिंहाचे मस्तक मागेपुढे हलवले.[८]

भीमाने मारलेली लाथ राज्यहरणाचा सूड म्हणून नाही आणि द्रौपदीची विटंबना केली म्हणूनही नाही. ती लाथ, दुर्योधनाने भीमाला 'गौर्गौः' म्हणून त्याच्या पौरुषावर उडवलेल्या शिंतोड्यांसाठी आहे.

संतापाने तांबडालाल झालेला भीम दुर्योधनाला पुढे म्हणतो,

येऽस्मान्पुरोऽपनृत्यन्त पुनर्गौरिति गौरिति।
तान्वयं प्रतिनृत्यामः पुनर्गौरिति गौरिति।।९.५८.७

– 'गौर्गौः' असे पुनःपुनः म्हणत आमच्याभोवती पूर्वी जे नाचले होते, त्यांना आम्ही आता 'गौर्गौः' असे पुनः पुनः म्हणत उलट नाचून दाखवत आहोत.

भीम दुर्योधनाभोवती आता 'गौर्गौः' म्हणत व अंगविक्षेप करत अक्षरशः नाचला, हे कथेत येथे अध्याहृत आहे.

भीम तेवढ्यावर थांबत नाही. तो दुर्योधनाजवळ आता स्वतःच्या शौर्याविषयी फुशारक्या मारतो. तो म्हणतो,

नास्माकं निकृतिर्वह्निर्नाक्षद्यूतं न वञ्चना।
स्वबाहुबलमाश्रित्य प्रबाधामो वयं रिपून्।।९.५८.८

– आमच्यात निकृती नाही की अग्नी नाही, अक्षद्यूत नाही की वंचना नाही. आम्ही शत्रूंना आमच्या स्वतःच्या बाहुबलावर ठेचत असतो.

भीमाला स्वतःचा पक्ष किती का सरळ असल्याचे वाटले असेना, पांडवांवर विजय मिळण्यासाठी युद्धापूर्वी कौरवांनी वापरलेले मार्ग आणि कौरवांवर विजय मिळवण्यासाठी युद्धात पांडवांनी वापरलेले मार्ग ह्यांत, धर्माच्या निकषावर घासून पाहता कितीसा फरक आहे, हा प्रश्नच आहे. ते कसेही असो, दुर्योधनाशी आपण जोवर 'स्वबाहुबलमाश्रित्य' लढत होतो तोवर आपण सपाटून मार खात होतो, आणि आपण केवळ धर्मबाह्य मार्गाचा आश्रय घेतल्यानेच आपला जीव वाचला आहे, हे कटुसत्य भीमाला किती सहज नजरेआड करता आले आहे!

भीमाच्या तोंडचे पुढचे काही श्लोक त्रिष्टुभ वृत्तात आहेत. तो त्याच्या भावांना उद्देशून म्हणतो,

ये नः पुरा षण्ढतिलानवोचन्
क्रूरा राज्ञो धृतराष्ट्रस्य पुत्राः।
ते नो हताः सगणाः सानुबन्धाः
कामं स्वर्गं नरकं वा व्रजामः।।९.५८.११

–जे आपल्याला पूर्वी 'षण्ढतिल'–पोचट तीळ–म्हणाले होते ते धृतराष्ट्र राजाचे क्रूर पुत्र, त्यांच्या अनुयायांसह व संबंधितांसह आपण ठार मारले आहेत. मग आता










आपल्याला (त्या कृत्याने) स्वर्ग मिळो की नरक मिळो!

भीमाच्या शब्दांमध्ये, आपण शेवटी एकदाचा सूड उगवला ह्याचे समाधान आहे. आपण त्यासाठी वापरलेले मार्ग धर्मबाह्य होते आणि त्यामुळे आपल्याला नरकात जावे लागण्याची शक्यता आहे, ह्याची जाणीव त्याच्या शब्दांमध्ये आहे. सूडापुढे त्याला क्षिती नाही एवढेच!

संजय सांगतो,

पुनश्च राज्ञः पतितस्य भूमौ<br>
स तां गदां स्कन्धगतां निरीक्ष्य।<br>
वामेन पादेन शिरः प्रमृद्य<br>
दुर्योधनं नैकृतिकेत्यवोचत्।। ९.५८.१२

–भूमीवर पडलेल्या राजाच्या खांद्यावर असलेल्या गदेकडे पुन्हा पाहून व त्याचे शिर डाव्या पायाने लाथाडून तो (भीम) दुर्योधनाला 'नैकृतिक' असे म्हणाला.

'नैकृतिक'–निकृति करणारा, हलकट–हा अपशब्द आहे.

भीमाने दुर्योधनाला आणखीही शिव्या व लाथा हाणल्या असत्या. पण आता युधिष्ठिर मध्ये पडून भीमाला म्हणतो,

मा शिरोऽस्य पदा मर्दीर्मा धर्मस्तेऽत्यगान्महान्।<br>
राजा ज्ञातिर्हतश्चायं नैतन्न्याय्यं तवानघ।। ९.५८.१५

– ह्याचे मस्तक लाथाडू नकोस. तुझ्या महान् धर्माचे तू उल्लंघन करू नकोस. हा राजा आहे, आपल्या ज्ञातीतला आहे, आणि हा मारला गेला आहे. 'अनघा', तुझे हे करणे न्याय्य नाही.

'अनघ' म्हणजे निष्पाप, निर्दोष.

भीमाने दुर्योधनाला धर्मबाह्य प्रहाराने पाडल्याचे युधिष्ठिराने पाहिले आहे. तथापि, पांडवपक्षातल्या इतर सर्वांप्रमाणे युधिष्ठिरानेही भीमाला त्या प्रहारावरून–कथेत येथेच नाही तर इतरही कोठे–दोष लावलेला नाही. तसेच, संजयाच्या वर्णनात येथे अध्याहृत असलेली आणि प्रस्तुत प्रसंगी पुढे युधिष्ठिराच्या तोंडी स्पष्ट शब्दांमध्ये असलेली गोष्ट म्हणजे, भीमाने 'तस्यावहासस्य फलमद्य त्वं समवाप्नुहि'–त्या उपहासाचे तू आज हे फळ भोग–असे म्हणून दुर्योधनाच्या मस्तकावर डावा पाय ठेवल्याठेवल्या युधिष्ठिर त्याला थांबवायला गेलेला नाही. दुर्योधनाला लाथा मारण्याचे भीमाच्या फार मनात आहे हे जाणून युधिष्ठिराने समजूनउमजून भीमाला तो अधर्म करू दिला असल्याचे त्याच्याच तोंडी कथेत पुढे आहे. युधिष्ठिराचा येथील मुद्दा आहे : 'केलेस तेवढे खूप झाले; आता पुरे.' युधिष्ठिराचे म्हणणे ऐकून भीमाने दुर्योधनाला लाथा घालणे थांबवले, हे कथेत येथे अध्याहृत आहे.

ह्यानंतर, भीमाच्या प्रहाराने मांड्या मोडून प्राणांतिक वेदना होत असलेल्या, आणि भीमाने मस्तकात लाथा हाणून अपमानित केलेल्या दुर्योधनाकडे जाऊन युधिष्ठिर त्याच्याशी बोलू लागतो. युधिष्ठिराचे डोळे आता पाण्याने भरून आले आहेत खरे; पण, त्याच्या भाषणावरून दिसून येते, की दुर्योधनाला बुद्ध्या मारून घेतल्यावर युधिष्ठिराला त्याचा आता एकाएकी कळवला आला असले काही त्यामागे नव्हते.[१]

युधिष्ठिर दुर्योधनाला म्हणतो,

आत्मनो ह्यपराधेन महद्व्यसनमीदृशम्।<br>
प्राप्तवानसि यल्लोभान्मदाद्बाल्याच्च भारत।।<br>
९.५८.२०

–भारता, तुझ्या स्वतःच्या अपराधामुळे, आणि तुझा लोभ, उन्मत्तपणा व मूर्खपणा ह्यांमुळेच तुझ्यावर ही कठीण परिस्थिती ओढवली आहे.

युधिष्ठिर त्याला पुढे म्हणतो,

स्नुषाश्च प्रस्नुषाश्चैव धृतराष्ट्रस्य विह्वलाः।<br>
गर्हयिष्यन्ति नो नूनं विधवाः शोककर्षिताः।।<br>
९.५८.२३

–धृतराष्ट्राच्या सुना व नातसुना शोकाकुल होऊन आता नक्की आमची गर्हणा करतील!

अपराध तुझा आणि गर्हणा मात्र आमची! दैव!!

संजय सांगतो,

एवमुक्त्वा सुदुःखार्तो निशश्वास स पार्थिवः।<br>
विललाप चिरं चापि धर्मपुत्रो युधिष्ठिरः।। ९.५८.२४

–असे म्हणून दुःखाने अतिशय आर्त झालेल्या त्या राजाने एक निश्वास सोडला आणि त्यानंतर धर्मपुत्र युधिष्ठिराने बराच वेळ (असाच) विलाप केला.

येथे अठ्ठावन्नावा अध्याय संपतो.

द्यूतात गेलेले राज्य पांडवांनी आता परत मिळवले; एवढेच नाही, तर द्यूताच्या वेळी, कौरवांनी केलेल्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




अनुक्रमणिका

त्यांच्या अप्रतिष्ठेचा त्यांनी सूड उगवला. कथेचा ओघ आता, दुर्योधनाच्या मांड्यांवर भीमाने केलेला प्रहार व दुर्योधन खाली पडल्यावर भीमाने त्याच्या मस्तकात घातलेल्या लाथा ह्या कृत्यांमधला धर्म-अधर्म ह्यांकडे वळतो.

* * *

## आरोप आणि प्रत्यारोप

एकोणसाठाव्या अध्यायाचा पूर्वार्ध, भीमाने दुर्योधनाला केलेल्या धर्मबाह्य प्रहारावरून बलरामाला आलेला संताप, आणि बलरामाला शांत करण्यासाठी कृष्णाने त्याच्याशी केलेले युक्तिवाद ह्यांच्या वर्णनाने व्यापला आहे.

भीमाने दुर्योधनाला अधर्म्य प्रहाराने पाडले ते पाडले आणि वर तो त्याच्या मस्तकात लाथा घालतो आहे, हे पाहून बलरामाला अनावर संताप आला. भीमाचा धिक्कार करून, व गदायुद्धात नाभीखाली प्रहार कधी कोणी केला नव्हता असे म्हणून बलराम पुढे म्हणाला,

अधो नाभ्या न हन्तव्यमिति शास्त्रस्य निश्चयः।
अयं त्वशास्त्रविन्मूढः स्वच्छन्दात्संप्रवर्तते।। ९.५९.६

–(गदायुद्धात) नाभीखाली प्रहार करायचा नाही असा शास्त्राचा पक्का नियम आहे. पण, शास्त्र न जाणणारा हा मूर्ख स्वतःच्या मनाला येईल ते करतो आहे.

ह्या 'अशास्त्रविद्' 'मूढा'ने केलेल्या त्या प्रहारामागे आपला धाकटा भाऊ असू शकेल, अशी बलरामाला शंकाही आलेली दिसत नाही. भीमाचा धिक्कार करत असताना बलरामाचा क्रोध वाढत जातो आणि शब्दांवर न थांबता बलराम आता लांगल (नांगराच्या आकाराचे बलरामचे खास शस्त्र) उगारून भीमावर धावून जातो. ते पाहून घाईघाईने कृष्ण मध्ये पडतो आणि बलरामाला महत्प्रसायाने धरून ठेवून त्याच्याशी बोलू लागतो.

बलरामाला शांत करण्याचा प्रयत्न म्हणून, भीमाने केलेल्या धर्मबाह्य प्रहाराविषयी कृष्ण बलरामाला आता सांगत असलेल्या गोष्टी लक्षपूर्वक वाचण्यासारख्या आहेत. आपल्या मित्रांच्या उत्कर्षात आणि त्यांच्या शत्रूंच्या हानीत आपलाही उत्कर्ष असतो, ह्या व्यावहारिक तत्त्वाची बलरामाला आठवण करून देऊन कृष्ण त्याला म्हणतो, "पांडव शुद्धपौरुषाचे असून ते आपले स्वाभाविक मित्र आहेत. ते आपले आतेभाऊ आहेत आणि त्यांच्या शत्रूंनी त्यांना अतिशय वाईट वागवले आहे."

बलरामाला सद्यःक्षणी इतर पांडव कसे दिसले आहेत ते त्याच्या शब्दांवरून सांगता येत नसले, तरी त्याचा तो 'अशास्त्रविद्' 'मूढ' शिष्य त्याला 'शुद्धपौरुषा'चा दिसलेला नाही, हे उघड आहे. ते कसेही असो, घडलेल्या गोष्टींकडे कृष्ण बलरामाला आता व्यावहारिकच नाही तर संकुचित व आत्मकेन्द्रित दृष्टीने पाहायला सांगतो आहे. धर्म-अधर्म अशा प्रकारे ठरवायचा असतो का, हा प्रश्न आहे.

कृष्णाच्या तोंडी तेथे भीमाच्या प्रतिज्ञेचा तिसऱ्यांदा व मैत्रेयांच्या शापाचा पहिल्यांदा उल्लेख आहे. कृष्ण म्हणतो :

प्रतिज्ञापारणं धर्मः क्षत्रियस्येति वेत्थ ह।
सुयोधनस्य गदया भङ्क्तास्म्यूरू महाहवे।
इति पूर्वं प्रतिज्ञातं भीमेन हि सभातले।। ९.५९.१४
मैत्रेयेणाभिशप्तश्च पूर्वमेव महर्षिणा।
ऊरू भेत्स्यति ते भीमो गदयेति परंतप।
अतो दोषं न पश्यामि मा क्रुधस्त्वं प्रलम्बहन्।।
९.५९.१५

–महायुद्धात मी दुर्योधनाच्या मांड्या गदेने फोडेन अशी भीमाने पूर्वी भरसभेत प्रतिज्ञा केली होती, आणि प्रतिज्ञा पार पाडणे हा क्षत्रियांचा धर्म आहे, हे तू जाणतोस. तसेच, महर्षी मैत्रेयांनी (दुर्योधनाला) पूर्वी शाप दिला होता, की भीम गदेने तुझ्या मांड्या फोडेल. तेव्हा, (भीमाने दुर्योधनाच्या मांड्या फोडल्या ह्यात) मला काही दोषास्पद दिसत नाही. बलरामा, तू संतापू नकोस.

ह्यानंतर, भाषणाचा शेवट म्हणून कृष्ण पुन्हा त्याच्या पहिल्या मुद्द्यावर येतो. तो बलरामाला सांगतो,

यौनैर्हार्दैश्च संबद्धैः संबद्धाः स्मेह पाण्डवैः।
तेषां वृद्ध्याभिवृद्धिर्नो मा कृधः पुरुषर्षभ।।९.५९.१६

–नात्याच्या आणि मैत्रीच्या संबंधांनी आपण पांडवांशी बांधलेले आहोत. त्यांच्या वृद्धीत आपलीही वृद्धी आहे. तेव्हा, पुरुषर्षभा, तू संतापू नकोस.

कृष्णाला ठाऊक आहे, की भीमाने दुर्योधनाच्या मांड्या फोडण्यामागे आपला हात असल्याचा बलरामाला पत्ता लागलेला नाही. कृष्णाने ती झाकली मूठ तशीच

ठेवली आहे. "भीमाच्या कृत्यात जर खरोखच काही दोषास्पद नव्हते, तर त्या कृत्यामागचा स्वतःचा हात कृष्णाने बलरामापासून का लपवून ठेवला?", हा प्रश्न विचारात पाडणारा असून त्याला संहितेत उत्तर नाही.

बलरामाचे कृष्णावर प्रेम असले, तरी तो कृष्णाला ओळखून आहे. म्हणूनच, कृष्ण करत असलेल्या युक्तिवादांना तो भुलत नाही. धर्म कसा आचरणात आणायचा असतो, ह्याविषयी कृष्णाला दोन शब्द सुनावून बलराम पुढे म्हणतो,

तदिदं व्याकुलं सर्वं कृतं धर्मस्य पीडनात्।
भीमसेनेन गोविन्द कामं त्वं तु याथत्थ माम्।।
९.५९.१९

– गोविंदा, धर्माची पायमल्ली करून भीमसेनाने सारे पार बिघडवून टाकले आहे. मग, तू मला काही का सांगेनास!

कृष्णाला दिसते आहे, की बलरामाला आपले म्हणणे पटले नसले, तरी त्याचा पारा थोडा उतरतो आहे. कृष्ण त्याला 'रागावू नकोस' असे पुन्हा म्हणून पुढे सांगतो,

प्राप्तं कलियुगं विद्धि प्रतिज्ञां पाण्डवस्य च।
आनृण्यं यातु वैरस्य प्रतिज्ञायाश्च पाण्डवः।।
९.५९.२१

–कलियुग (जवळ) आले आहे हे लक्षात घे,[१०] ह्या पांडवाची प्रतिज्ञा (लक्षात घे), आणि वैर आणि प्रतिज्ञा ह्यांचे ऋण ह्या पांडवांनी फेडले असे मान.

भीमाच्या प्रतिज्ञेचा कृष्णाच्या तोंडी असलेला हा चौथा व शेवटला उल्लेख येथे आहे.

भीमाच्या प्रहारामागचा स्वतःचा हात कृष्णाने बलरामाला येथेही सांगितलेला नाही.[११]

कृष्णाचे म्हणणे बलरामाला पटले अशातले नाही. तथापि, बलराम आता शस्त्र वापरण्याऐवजी शब्द वापरण्यावर येतो. संजय सांगतो,

धर्मच्छलमपि श्रुत्वा केशवात्स विशां पते।
नैव प्रीतमना रामो वचनं प्राह संसदि।।९.५९.२२

– राजा, कृष्णाकडून तो 'धर्मच्छल' ऐकल्यावर मन अप्रसन्न झालेला बलराम तेथे जमलेल्या सर्वांना म्हणाला.

कृष्णाने बलरामाबरोबर केलेल्या युक्तिवादांचा 'धर्मच्छल' हा सारांश संजयाचा आहे. संजयाच्या त्या शब्दाचा अर्थ आहे, धर्माच्या नावाखाली केलेली बनवाबनवी.

संजय आता, घडलेल्या घटनेचे बलरामाचे मूल्यमापन धृतराष्ट्राला सांगतो. बलरामाने वापरलेले शब्द तीक्ष्ण व असंदिग्ध आहेत. बलराम म्हणाला, "दुर्योधनाला अधर्माने मारल्यावरून भीमाची सर्व जगात 'जिह्मयोधी' – कपटाने युद्ध करणारा – अशी ख्याती होईल; आणि धर्मात्म्या दुर्योधनाला शाश्वत गती प्राप्त होईल. अधर्माने मारला गेलेला हा दुर्योधन 'ऋजुयोधी'–धर्मास धरून युद्ध करणारा–होता." 'जिह्मयोधी' ह्या शब्दात तीव्र गर्हणा असून 'ऋजुयोधी' ह्या शब्दात मोठी स्तुती आहे. ह्यानंतर, संतापलेला बलराम तेथे अधिक न थांबता तडक द्वारकेला निघून जातो आणि त्याचा प्रस्तुत प्रसंगाशी संबंध संपतो.

अठ्ठावन्नाव्या अध्यायात वर्णिलेला युधिष्ठिराचा विलाप पुरा झाल्यावर तो बलराम व कृष्ण ह्यांच्याकडे आला होता; आणि त्याने बलराम व कृष्ण ह्यांच्या संभाषणातला बराचसा भाग ऐकला आहे, हे कथेत येथे अध्याहृत आहे.

कटुसत्य ऐकणे कोणाला आवडत असते? संजय सांगतो,

पाञ्चालाश्च सवार्ष्णेयाः पाण्डवाश्च विशां पते।
रामे द्वारवतीं याते नातिप्रमनसोऽभवन्।। ९.५९.२७

–राजा, बलराम द्वारकेला निघून गेला तेव्हा सर्व पांचाल, वृष्णी व पांडव ह्यांची मने पार बिघडून गेली.

*　*　*

एकोणसाठाव्या अध्यायाचा उरलेला भाग कृष्ण व युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये घडलेल्या अप्रसन्न संवादाने व्यापला आहे. त्या संवादाला सुरुवात कृष्णाने केली आहे.

भीमाच्या प्रस्तुत प्रसंगीच्या वागण्यात दोन धर्मबाह्य गोष्टी घडल्या आहेत: भीमाने गदायुद्धात दुर्योधनाच्या मांड्यांवर केलेला प्रहार, आणि विकलांग होऊन धुळीत पडलेल्या दुर्योधनाच्या मस्तकात त्याने हाणलेल्या लाथा. असे दिसते, की कृष्णाच्या दृष्टीने ह्यांपैकी पहिली गोष्ट क्षम्य होती; कारण, ती केली नसती, तर पांडवांना राज्य मिळाले नसते. परंतु, भीमाने दुर्योधनाला हाणलेल्या लाथा कृष्णाला क्षम्य वाटलेल्या नाहीत. गमतीची गोष्ट म्हणजे–कृष्ण युधिष्ठिरावर आधीच वैतागला होता म्हणून

अनुक्रमणिका

असो वा इतर कोठल्या कारणाने असो–कृष्णाने त्या धर्मबाह्य आचरणावरून भीमाला दोष न देता युधिष्ठिराला दिला आहे. भीमाच्या कृत्याचे बलरामाचे नैतिक मूल्यमापन ऐकून आधीच दीन व अधोमुख झालेला युधिष्ठिराला कृष्ण म्हणतो,

धर्मराज किमर्थं त्वमधर्ममनुमन्यसे।
हतबन्धोर्यदेतस्य पतितस्य विचेतसः।। ९.५९.२९
दुर्योधनस्य भीमेन मृद्यमानं शिरः पदा।
उपप्रेक्ष्यसि कस्मात्त्वं धर्मज्ञः सन्नराधिप।। ९.५९.३०

–धर्मराजा, तू अधर्माला (मूक) अनुमती कशी दिलीस? राजा, सारे बांधव मारले गेलेल्या व (भूमीवर) निश्चेष्ट पडलेल्या ह्या दुर्योधनाचे मस्तक भीम पायाने लाथाडत होता तेव्हा, धर्मज्ञ असलेला तू नुसता पाहत कसा राहिलास?

भीम दुर्योधनाच्या मस्तकात लाथा घालत असताना कृष्ण बलरामाला शांत करण्यात गुंतला होता आणि त्यामुळे त्याला स्वतःला मध्ये पाडून भीमाला थांबवता आले नाही, हे कथेत येथे अध्याहृत आहे.

आता धर्मराजाने केलेले आत्मसमर्थन. तो कृष्णाला म्हणतो,

न ममैतत्प्रियं कृष्ण यद्राजानं वृकोदरः।
पदा मूर्ध्न्यस्पृशत्क्रोधान्न च हृष्ये कुलक्षये।। ९.५९.३१

– कृष्णा, भीमाने क्रोधाच्या भरात राजाच्या मस्तकाला पायाने स्पर्श केला, हे मला आवडलेले नाही. पण, तसेच, (आमचा) कुलक्षय झाला ह्यातही मला आनंद झालेला नाही.,

युद्धात कुलक्षय होईल हे जाणून, युद्ध टाळण्याचे युधिष्ठिराने आटोकाट प्रयत्न केले होते. म्हणून, युधिष्ठिराच्या सद्यःप्रसंगीच्या दृष्टिकोनातून पाहता त्याविषयी असे म्हणता येते, की त्याने कुलक्षय केवळ निरुपाय म्हणून होऊ दिला होता.[१३] निश्चेष्ट पडलेल्या दुर्योधनाच्या मस्तकात लाथा मारण्याचा अधर्म भीम करत असल्याचे दिसत असताना युधिष्ठिराने तो त्याला करू दिला, ही गोष्ट 'निरुपाय' ह्या सदरात बसणारी नाही. त्याविषयी कृष्णाने विचारलेल्या प्रश्नाला उत्तर म्हणून युधिष्ठिर आता, 'माझे तिकडे लक्ष नव्हते' किंवा, 'भीमाने माझी अनुमती मागितली नाही', असल्या मखलाशा करत नाही. धार्तराष्ट्रांनी 'निकृति' वापरून आम्हाला नित्य फसवले आणि अनेक कटू शब्द बोलून आम्हाला वनात काढून दिले, असे सांगून युधिष्ठिर पुढे म्हणतो,

भीमसेनस्य तद्दुःखमतीव हृदि वर्तते।
इति संचिन्त्य वार्ष्णेय मयैतत्समुपेक्षितम्।। ९.५९.३३
तस्माद्धत्वाकृतप्रज्ञं लुब्धं कामवशानुगम्।
लभतां पाण्डवः कामं धर्मेऽधर्मेऽपि वा कृते।।
९.५९.३४

–कृष्णा, भीमसेनाच्या हृदयात (ह्या साऱ्याचे) अतीव दुःख आहे हे विचारात घेऊन (भीम दुर्योधनाच्या मस्तकात लाथा मारत असल्याचे दिसूनही) मी त्या गोष्टीची उपेक्षा केली. (भीमसेनाच्या हृदयात अतीव दुःख आहे) तेव्हा, त्या मूर्ख, लोभी, व इच्छांच्या आहारी गेलेल्या दुर्योधनाला मारल्यावर (त्याच्या मस्तकात लाथा घालण्याची) भीमाची इच्छा तरी पुरी होऊ दे–मग तसे करण्यात (भीमाकडून) धर्म घडत असो वा अधर्म घडत असो–(म्हणून भीम लाथा मारत असल्याचे दिसूनही मी त्या गोष्टीची उपेक्षा केली).

दुर्योधनाच्या मांड्या फोडल्यावरून किंवा दुर्योधनाच्या मस्तकात लाथा घातल्यावरून भीमाला दोष देणे तर लांब राहिले. 'क्रिया' आणि 'उपाय' ही भाषा बोलणारा कृष्णही ज्याला स्पष्ट शब्दांमध्ये अधर्म म्हणतो आहे, त्यालाही आता सरळसरळ अधर्म म्हणायची युधिष्ठिराची तयारी नाही.

युधिष्ठिराचे आत्मसमर्थन येथे संपते.

कृष्णाला युधिष्ठिराचे आत्मसमर्थन पटले अशातले नाही. तथापि, हा विषय अधिक वाढवून, तेथे जवळच उभ्या असलेल्या भीमाच्या आनंदावर विरजण घालण्यात काही अर्थ नाही असे वाटल्याने की काय, कृष्ण युधिष्ठिराला "काममस्त्वेवम्"–बरे, असो!– असे मोठ्या कष्टाने म्हणाला. घडलेल्या साऱ्या गोष्टींमधला धर्म-अधर्म ह्या विषयावर कृष्णाने पडदा पाडल्याचे पाहून आता युधिष्ठिरही तेच करतो. संजय सांगतो,

इत्युक्तो वासुदेवेन भीमप्रियहितैषिणा।
अन्वमोदत तत्सर्वं यद्भीमेन कृतं युधि।। ९.५९.३६

–भीमाचे प्रिय व हित इच्छिणाऱ्या वासुदेवाने असे म्हटल्यावर, भीमाने (गदा) युद्धात जे काही केले होते,

त्या सगळ्याला (युधिष्ठिराने) अनुमोदन दिले.

युधिष्ठिराचे हे अनुमोदन भीमाने केलेला प्रहार आणि त्याने घातलेल्या लाथा ह्या दोन्हींना आहे.

आपल्या माणसाने आपल्या शत्रूवर केलेले अन्याय पोटात घालणे किती सोपे असते! जयासक्ती आणि सूड ह्यांनी प्रेरित होऊन तिन्ही कौंतेय प्रस्तुत प्रसंगी कसे वागले आहेत, ते व्यासांनी आपल्यासमोर मोठ्या नाट्यपूर्ण प्रकारे मांडले आहे : राज्य जाणार असे दिसल्यावर धर्मबिर्म गुंडाळून ठेवून मांडीवर थाप मारणारा एक कौंतेय; स्वतःचा जीव वाचवण्यासाठी दुर्योधनाला धर्मबाह्य प्रहाराने मारून झाल्यावर तेवढ्यावर न थांबता त्याच्या मस्तकात लाथा घालत स्वतःच्या शौर्याविषयी फुशारक्या मारणारा दुसरा कौंतेय; आणि दुर्योधनाला जिवे मारता यावे म्हणून त्याला डिवचून डिवचून युद्धाला उभे करणारा, धर्मबाह्य प्रहाराने पाडल्या गेलेल्या व आसन्नमरण असलेल्या दुर्योधनाजवळ बसून तो तसा मारला गेल्याचे खापर त्याच्याच माथी फोडणारा, आणि भीमाने केलेल्या सर्व धर्मबाह्य गोष्टींना मोठ्या मनाने अनुमोदन देणारा तिसरा कौंतेय! हे सारे पाहिले की, व्यासांनी पांडव केवळ पांढऱ्या रंगात रंगवलेले नाहीत, ह्याचा पुनश्च प्रत्यय येतो.

कृष्ण आणि युधिष्ठिर ह्यांचे हे संभाषण घडत असताना, धार्तराष्ट्रांना आपण कशाही प्रकारे काहीही केले तरी ते केवळ योग्यच नव्हे तर कमीच आहे, असे वाटणारा भीम तेथे जवळच उभा होता. आपल्या कृत्यांमधला धर्म-अधर्म ह्यांविषयीची चर्चा संपल्याचे त्याला दिसते. 'जशास तसे' ह्या विचाराच्या भीमावर त्या चर्चेचा काडीमात्र परिणाम झालेला दिसत नाही. तो आता हर्षाने युधिष्ठिरासमोर येतो आणि ओंजळ जोडून त्याला म्हणतो,

तवाद्य पृथिवी राजन्क्षेमा निहतकण्टका।
तां प्रशाधि महाराज स्वधर्ममनुपालयन्।। ९.५९.३९

–राजा, कुशल व निष्कंटक झालेली पृथ्वी आता तुझी आहे. तू स्वधर्मानुसार तिच्यावर राज्य कर.

युधिष्ठिर भीमाला म्हणतो,

दिष्ट्या जयसि दुर्धर्ष दिष्ट्या शत्रुर्निपातितः।। ९.५९.४४

–पराक्रमी वीरा, तू विजय मिळवलास हे महद्‌भाग्य आहे आणि आपला शत्रू मारला गेला हेदेखील महद्‌भाग्य आहे.

जुन्या काळच्या ह्या हार्दिक अभिनंदनाने एकोणसाठावा अध्याय संपतो.

* * *

साठाव्या अध्यायाची सुरुवात, दुर्योधन मारला गेल्याचे दिसल्यापासून पांडवसेनेत सुरू झालेल्या विजयोत्सवाच्या वर्णनाने झाली आहे. संजय सांगतो, की त्या सर्वांनी शंख फुंकले, उत्तरीय वस्त्रे हवेत फडकवली आणि सिंहनाद केले; हर्षाने ते सारे इतके नाचले, की त्यांना धारण करणे पृथ्वीला सहन होईना. भीमाने दुर्योधनावर केलेला प्रहार, तसेच भीमाने दुर्योधनाच्या मस्तकात घातलेल्या लाथा ह्या दोन्ही गोष्टी धर्माला धरून नव्हत्या, हे पांडवसेनेला स्पष्ट आहे. पण त्या गोष्टी पांडवसेनेला दोषार्ह वाटण्याऐवजी स्तुत्य वाटल्या आहेत. जय तो जय, मग तो कसाही मिळवलेला असो, असे पांडवसेनेचे मत दिसते.

पांडवसेनेचा हा असा विजयोत्सव काही काळ चालल्यानंतर, एकोणसाठाव्या अध्यायात वर्णिलेले प्रसंग संपतात आणि कृष्णप्रभृती पांडवाग्रणी पांडवसेनेकडे वळतात. मग कृष्ण साऱ्या सेनेला उद्देशून म्हणतो, "हा दुर्योधन मेल्यातच जमा आहे, त्याला आता उग्र बोलून अधिक काय मिळणार आहे? चला, आपण येथून आता निघून जाऊ या. हा पापी मारला गेला ते ठीकच झाले." हे सारे म्हणताना कृष्णाने दुर्योधनाला चार शिव्याही घातल्या आहेत.

मांड्या फुटून धुळीत पडल्यापासून कथेत येथवर दुर्योधनाच्या तोंडी एकही शब्द नव्हता. प्राणांतिक वेदना होत असल्याने त्याला बोलवत नव्हते. कृष्णाचे भाषण ऐकूण संताप आलेला दुर्योधन आता वेदनांकडे दुर्लक्ष करून जेमतेम उठून बसतो व कृष्णाला उद्देशून बोलू लागतो. पांडवपक्षाने जयासाठी युद्धात वेळोवेळी केलेली धर्मबाह्य कृत्ये आणि त्या कृत्यांमागचा कृष्णाचा हात, ह्याविषयीचा दुर्योधनाचा कयास कथेत येथे येतो आहे. दुर्योधन म्हणतो,

कंसदासस्य दायादः...








–अरे कंसाच्या दासाच्या पोरा,

तुच्छता व तिरस्कार ठासून भरलेल्या त्या संबोधनात, दुर्योधनाचे कृष्णाविषयीचे मत उत्तम प्रकारे व्यक्त झाले आहे. दुर्योधन पुढे म्हणतो, ....

न ते लज्जास्त्यनेन वै।

अधर्मेण गदायुद्धे यदहं विनिपातितः।। ९.६०.२७

ऊरू भिन्धीति भीमस्य स्मृतिं मिथ्यां प्रयच्छता।

किं न विज्ञातमेतन्मे यदर्जुनमवोचथाः।। ९.६०.२८

–'ह्याच्या मांड्या फोड' ही लबाडी भीमाला (अर्जुनाकडून) खुणावून[१३] (आणि वर) तुला त्याची लाजही वाटत नाही! तू अर्जुनाला काय सांगितलेस ते काय मला माहीत नाही (असे तुला वाटते)?

कृष्ण व अर्जुन ह्यांच्यामधला संवाद दुर्योधनाने ऐकला नव्हता. तथापि, प्रस्तुत प्रसंगाच्या रचनेत असे अध्याहत आहे, की गदाप्रहाराने कवच फुटून बेशुद्ध पडलेला भीम शुद्धीवर येऊन गदायुद्ध पुन्हा सुरू झाल्यावर कृष्ण अर्जुनाशी काहीतरी बोलला, आणि त्यानंतर अर्जुनाने स्वतःच्या मांडीवर थाप मारली, हे दुर्योधनाने पाहिले होते. त्या थापेचा अर्थ दुर्योधनाला आता उमगला आहे, आणि त्या थापेमागे कृष्ण आहे, हा त्याने बांधलेला अंदाज आहे.

दुर्योधनाचा कयास केवळ संशयावर आधारलेला नाही. गदायुद्ध सोडून दुसऱ्याही अनेक आणीबाणीच्या प्रसंगी कृष्णाने पांडवांना धर्मबाह्य मार्ग सुचवल्याचे दुर्योधनापर्यंत काहीतरी प्रमाणात पोचले आहे. त्या संदर्भात त्याने कृष्णावर आता केलेले दोषारोप असे : तू शिखंडीला पुढे करून भीष्मांना मारवून घेतलेस; तू अश्वत्थामा ह्याच नावाचा हत्ती मारून घेऊन द्रोणांकडून शस्त्र खाली ठेववून घेतलेस; धृष्टद्युम्न द्रोणांचा वध करत असल्याचे पाहूनही तू त्याला आवरले नाहीस; प्रायास बसलेल्या छिन्नबाहू भूरिश्रव्याचा तू सात्यकीकडून वध करवून घेतलास; कर्णाने अर्जुनाच्या वधासाठी मागून घेतलेली शक्ती तू त्याला घटोत्कचावर वापरायला लावून फुकट दवडलीस; अर्जुनाचा वध करण्यासाठी कर्णाने सोडलेला –अश्वसेन नाग ज्यावर बसला होता तो–ठेवणीतला बाण तू व्यर्थ घालवलास; कर्णाच्या रथाचे चक्र जमिनीत रुतून बसले असताना तू त्याला मारवून घेतलेस. थोडक्यात म्हणजे, कौरवपक्षातल्या प्रत्येक अग्रणीच्या वधामागे कृष्णाने पांडवांना केलेल्या धर्मबाह्य सूचना असल्याचे दुर्योधनाला दिसले आहे.

भाषणाचा उपसंहार म्हणून दुर्योधन कृष्णाला सांगतो,

यदि मां चापि कर्णं च भीष्मद्रोणौ च संयुगे।

ऋजुना प्रतियुध्येथा न ते स्याद्विजयो ध्रुवम्।।
९.६०.३७

त्वया पुनरनार्येण जिह्ममार्गेण पार्थिवाः।

स्वधर्ममनुतिष्ठन्तो वयं चान्ये च घातिताः।। ९.६०.३८

–तू जर माझ्याशी, कर्णाशी, भीष्मांशी आणि द्रोणांशी ऋजुमार्गाने प्रतियुद्ध करतास, तर तुझा विजय नक्कीच झाला नसता. स्वधर्माचे आचरण करत असलेल्या आम्हाला व इतरही राजांना, अनार्य असलेल्या तू जिह्ममार्गांनी – कपटयुक्त – मार्गांनी – मारून घेतले आहेस.

घडून गेलेले युद्ध दुर्योधनाला आता कौरव विरुद्ध पांडव ह्या स्वरूपात न दिसता कौरव विरुद्ध कृष्ण, आणि ऋजुमार्ग विरुद्ध जिह्ममार्ग ह्या स्वरूपात दिसले आहे. दुर्योधनाचे भाषण येथे संपते.

दुर्योधनाने कृष्णावर–आणि अप्रत्यक्षपणे पांडवांवर– येथे केलेले दोषारोप कितपत खरे आहेत, हा प्रश्न गुंतागुंतीचा आहे. तटस्थ दृष्टीने पाहता असे दिसते, की त्यांतले काही महत्त्वाचे दोषारोप खरे असले, तरी काही दोषारोप चुकीचे आहेत, काही अर्धवट खरे आहेत आणि काहींमध्ये अतिशयोक्ती आहे. तथापि, दुर्योधनाने केलेले दोषारोप शब्दशः खरे आहेत का ते तपासण्यापेक्षा, दुर्योधनाच्या मथितार्थाकडे व त्या मथितार्थाच्या खरेखोटेपणाकडे पाहणे जास्त महत्त्वाचे आहे. दुर्योधनाचा मथितार्थ असा, की कौरवपक्षातल्या अग्रणींना मारण्यासाठी पांडवपक्षाने धर्मास धरून नसलेल्या गोष्टी युद्धात पुनःपुनः केल्यानेच ते जिंकले आहेत, आणि धर्मास धरून नसलेल्या त्या सर्व गोष्टींमागे कृष्ण होता.

पांडवांचा पक्ष सर्वस्वी धर्माचा आणि कौरवांचा पक्ष सर्वस्वी अधर्माचा अशी आपल्या मनाची सामान्यतः धारणा असते. आपल्या मनाच्या त्या धारणेमुळे, 'दुर्योधनाच्या मथितार्थाकडे पाहता त्याने कृष्णावर केलेले

अनुक्रमणिका

दोषारोप कितपत खरे आहेत?' हा प्रश्न प्रस्तुत प्रसंगाचेच नाही, तर समग्र कथेचे सम्यक् रसग्रहण होण्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. कथेच्या विश्वात काय खरे आणि काय खोटे, कोण बरोबर आणि कोण चूक, असल्या प्रश्नांना व्यास साधीसरळ उत्तरे सामान्यतः देत नसतात. संवादाच्या स्वरूपात रचलेल्या त्यांच्या कथेत ते असले प्रश्नही स्पष्ट शब्दांमध्ये उभे करत नसतात. ह्या बाबतीत त्यांची पद्धत अशी : ते त्याविषयी कथेत कोठेतरी काही अर्थगर्भ प्रसंग घालतात, आणि त्या प्रसंगांचा संबंध व अर्थ लावण्याचे काम आपल्यावर सोपवतात. वर उपस्थित केलेल्या प्रश्नाच्या संदर्भात व्यासांनी रचलेला अर्थगर्भ प्रसंग लेखात पुढे येतो आहे.

ते कसेही असो, कृष्ण दुर्योधनाचे दोषारोप निमूटपणे ऐकून घेईल हे शक्यच नव्हते. कृष्णाची अडचण अशी, की त्या दोषारोपांच्या तपशिलांमध्ये जरी अधिक-उणे असले, तरी दुर्योधनाचा मथितार्थ खोडून काढायला कृष्णाकडे खास काही नव्हते. दुसरे म्हणजे, कृष्णाच्या मनात दुर्योधनाला सणसणीत प्रत्युत्तर द्यायचे आहे; दुर्योधनाचे दोषारोप खोडून काढून ते साधणार नव्हते. अशा परिस्थितीत वापरायचा मार्ग मनुष्यस्वभावाचा घटक असल्याने आपल्या सर्वांनाच तो परिचित असतो. तो म्हणजे, आपल्यावरच्या दोषारोपांना डावलायचे, आणि ते दोषारोप करणाऱ्याची लायकी काढून आपणच त्याच्यावर प्रत्यारोप करायचे. अगदी ठणकावून. कृष्ण आता तो मार्ग वापतो.

कृष्ण दुर्योधनाला प्रथम म्हणतो,
हस्तस्त्वमसि गान्धारे सभ्रातृसुतबान्धवः।
सगणः ससुहृच्चैव पापमार्गमनुष्ठितः।। ९.६०.३९
तवैव दुष्कृतैर्वीरौ भीष्मद्रोणौ निपातितौ।
कर्णश्च निहतः संख्ये तव शीलानुवर्तकः।।
९.६०.४०

–गांधारीपुत्रा, तू पापमार्ग वापरल्यानेच तुझे भ्राते, पुत्र, बांधव, अनुयायी व मित्र ह्यांच्यासह तू मारला गेला आहेस. भीष्म व द्रोण हे वीर तुझ्याच दुष्कृत्यांमुळे मारले गेले आहेत; आणि तुझ्या शीलाचे अनुवर्तन केल्यानेच कर्ण युद्धात मारला गेला आहे.

पांडवांनी जयासाठी वापरलेल्या मार्गांमधला धर्म-अधर्म, विशेषतः त्यांनी भीष्म, द्रोण व कर्ण ह्यांना मारण्यासाठी वापरलेल्या मार्गांमधला धर्म-अधर्म, हा गैरसोईचा मुद्दा डावलून, पांडवांनी युद्धात मारलेल्या सर्वांच्या मृत्यूला कृष्ण दुर्योधनालाच जबाबदार धरतो आहे!.....तू धड वागला नाहीस म्हणून आम्हाला त्यांना मारणे भाग पडले!

आता प्रत्यारोप. ते असे : मी हास्तिनपुराला आलो होतो तेव्हा वडलोपार्जित राज्याचा पांडवांचा न्याय्य हिस्सा मागूनही तू तो त्यांना दिला नाहीस; तू भीमाला विष चारलेस; तू पांडवांना जाळायचा प्रयत्न केलास; द्रौपदी रजस्वला असताना. तू तिला सभेत खेचून आणवलीस; अनक्षज्ञ पण धर्मज्ञ असलेल्या युधिष्ठिराला तू अक्षविद् शकुनीकडून निकृतीने पराभूत करून घेतलेस;[१४] बाल अभिमन्यू युद्धात अनेकांकडून मारला जायला तू जबाबदार आहेस.

पांडवांच्या दृष्टिकोनातून पाहता, ह्या साऱ्या गोष्टींमध्ये दुर्योधनाचा सरळच हात होता, असे म्हणता येते. तथापि, दुर्योधनाची नालायकी त्याच्या पदरी घालण्यासाठी त्या पुरेशा नाहीत असे वाटून की काय, तृणबिंदू ऋषींच्या आश्रमात जयद्रथाने द्रौपदीला पळवून नेण्याचा प्रयत्न केला होता, त्याचेही खापर कृष्णाने दुर्योधनाच्या माथी फोडले आहे.

कृष्णाचा मथितार्थ असा : तुझ्या दुष्कृत्यांमुळे तू व तुझ्या पक्षातले सर्वजण वधास पात्र होतात. तुम्हाला मारण्यासाठी आम्ही वापरलेले मार्ग धर्माला धरून होते की नव्हते, हा मुद्दा अप्रस्तुत आहे.

ह्या साऱ्याबरोबर कृष्णाने दुर्योधनाला दोन शिव्याही घातल्या आहेत.

* * *

मांड्या मोडून धुळीत पडल्यावरही माणूस म्हणून न मोडलेला दुर्योधन कृष्णाच्या प्रत्यारोपांना आता उत्तर देतो. महाभारतातल्या काही अविस्मरणीय क्षणांपैकी हा एक क्षण आहे; आणि त्या क्षणाला साजेल अशाच प्रकारे कथा, प्रसंग, पात्र, नाट्य, व भाषा हे सारे व्यासांनी येथे जुळवून आणले आहे.

ह्या निर्लज्ज अनार्याच्या तोंडी लागण्यात काही अर्थ नाही, असे दुर्योधनाला वाटले म्हणून म्हणा किंवा

प्रत्युत्तरादाखल बोलण्यासारखे दुर्योधनाकडे काही नव्हते म्हणून म्हणा, दुर्योधन कृष्णाचे प्रत्यारोप खोडून काढायला जात नाही. त्याऐवजी दुर्योधन आता, आपले स्वतःचे जीवन कोठल्या स्वरूपाचे होते आणि समीप आलेले आपले स्वतःचे मरण कोठल्या स्वरूपाचे असणार आहे, ते कृष्णाला सांगतो (९.६०.४७-५०). आपले काही चुकले असे दुर्योधनाला अजूनही वाटलेले नाही आणि त्याला स्वतःची कणवही आलेली नाही. उलट, त्याच्या शब्दांमध्ये स्वतःविषयी अभिमान व कृतकृत्यता असून त्याला कपटाने मारणाऱ्यांविषयी तुच्छता आहे. तो कृष्णाला म्हणतो,

अधीतं विधिवद्दत्तं भूः प्रशास्ता ससागरा।
मूर्ध्नि स्थितममित्राणां को नु स्वन्ततरो मया।।
९.६०.४७

–मी (वेदांचे) अध्ययन केले; विधिपूर्वक दाने दिली; सागरासह सर्व पृथ्वीवर राज्य केले आणि शत्रूंच्या मस्तकावर पाय ठेवून उभा राहिलो. तेव्हा, माझ्याहून अधिक उत्तम मरण[१५] कोणाला प्राप्त होणार आहे?

दुर्योधनाला त्याचे शत्रू कोण वाटले आहेत? पांडव! पांडवांविरुद्ध त्याने केलेली कृत्ये पांडवांच्या मते किती का गर्हणीय असेनात, दुर्योधनाच्या मते शत्रूंच्या मस्तकावर तसाच पाय ठेवायचा असतो.

यदिष्टं क्षत्रबन्धूनां स्वधर्ममनुपश्यताम्।
तदिदं निधनं प्राप्तं को नु स्वन्ततरो मया।।९.६०.४८

– स्वधर्माचे पालन करणाऱ्या क्षत्रियांना इष्ट असते तसेच हे निधन मला प्राप्त झाले आहे. तेव्हा, माझ्याहून अधिक उत्तम मरण कोणाला प्राप्त होणार आहे?

रणात लढत असताना शत्रूच्या हातून आलेले मरण क्षत्रियांना इष्ट होय, असे क्षात्र धर्म सांगतो.

देवार्हा मानुषा भोगाः प्राप्ता असुलभा नृपैः।
ऐश्वर्यं चोत्तमं प्राप्तं को नु स्वन्ततरो मया।।
९.६०.४९

–देवांना योग्य आणि दुसऱ्या राजांना जे दुर्लभ असे मानवी भोग मला प्राप्त झाले आहेत. मला उत्तम ऐश्वर्य प्राप्त झाले आहे. तेव्हा, माझ्याहून अधिक उत्तम मरण कोणाला प्राप्त होणार आहे?

त्याला हिणकस ठरवणाऱ्या सर्वांना, स्वतःच्या जीवनाविषयीचे व मरणाविषयीचे हे मूल्यमापन मोठ्या अभिमानाने सांगून झाल्यावर दुर्योधन कृष्णाला तुच्छतेने म्हणतो,

ससुहृत्सानुबन्धश्च स्वर्गं गन्ताहमच्युत।
यूयं विगतसंकल्पाः शोचन्तो वर्तयिष्यथ।। ९.६०.५०

–अच्युता, माझे इष्टमित्र व अनुयायी ह्यांच्यासह मी आता स्वर्गी जातो आहे. मनोरथ भग्न झालेले तुम्ही सारेपण शोक करत येथे खुशाल जगा।

'अच्युत' हे खरेतर सन्मानाचे संबोधन आहे. दुर्योधन कृष्णाला आता 'कंसदासस्य दायाद' न म्हणता 'अच्युत' म्हणत असला, तरी ते उपहासाने आहे. दुर्योधनाचे भाषण येथे संपते.[१६]

दुर्योधनाने 'को नु स्वन्ततरो मया' म्हटले काय किंवा आणखी दुसरे काही म्हटले काय, त्याच्या शब्दांना पांडवपक्षातल्या कोणी कवडीचीही किंमत दिली नसती. उलट, त्याचे ते भाषण ही केविलवाणी आत्मश्लाघा आहे असे ठरवून ते सारे त्याला खदाखदा हसले असते. तथापि, पांडवपक्षातल्या कृष्णासकट सर्वांची तोंड खरकवणारी एक अनपेक्षित घटना आता घडते. संजय सांगतो,

अस्य वाक्यस्य निधने कुरुराजस्य भारत।
अपतत्सुमहद्वर्षं पुष्पाणां पुण्यगन्धिनाम्।। ९.६०.५१
अवादयन्त गन्धर्वा जगुश्चाप्सरसां गणाः।
सिद्धाश्च मुमुचुर्वाचः साधुः साध्विति भारत।।
९.६०.५२

–भारता, कुरुराजाचे ते भाषण संपताच (त्याच्यावर आकाशातून) सुगंधी फुलांचा मोठा वर्षाव झाला. भारता, गंधर्व वाद्ये वाजवू लागले; अप्सरांचे गण (दुर्योधनाची यशोगीते) गाऊ लागले; आणि सिद्धांनीही 'साधु! साधु!'- वा, वा! उत्तम!- असे उद्गार काढले.

आकाशातून झालेली पुष्पवृष्टी दुर्योधनावर झाली असून ती देवांनी केली आहे, आणि संजयाने येथे वर्णिलेल्या साऱ्या अद्भुत गोष्टी पांडवपक्षातल्या सर्वांपर्यंत पोचल्या आहेत, हे कथेत येथे अध्याहृत आहे.

संजय वर्णितो आहे ते सारे, स्वर्गात यावयाला निघालेल्या दुर्योधनाचे देवादिक करत असलेले हार्दिक स्वागत आहे. घडून गेलेल्या युद्धात एकटा दुर्योधनच

अनुक्रमणिका

काही शत्रुसंमुख मारला गेलेला नाही हे लक्षात घेतले, की देवादिक करत असलेल्या दुर्योधनाच्या स्वागतात, दुर्योधनाने नुकत्याच व्यक्त केलेल्या त्याच्या स्वतःच्या जीवनाविषयीच्या व मरणाविषयीच्या मूल्यमापनाला दुजोरा आहे, हे स्पष्ट होते. कृष्णाने व पांडवांनी सर्वतोपरीने हिणकस व नालायक ठरवलेल्या ह्या माणसाविषयीचे देवादिकांचे मूल्यमापन किती वेगळे आहे!

व्यासांनी पांडवांसाठी केवळ पांढरा रंग वापरलेला नाही तसाच दुर्योधनासाठी केवळ काळा रंग वापरलेला नाही, हे येथे स्पष्ट होते.

दुर्योधनाच्या नालायकीविषयी पांडवपक्षातल्या सर्वांची मनोमन किती का खात्री असेना, देवादिकांनी दुर्योधनावर केलेली पुष्पवृष्टी, अप्सरा गात असलेली त्याची यशोगीते, सिद्धांनी त्याच्याविषयी काढलेले स्तुतिपर शब्द, ह्या साऱ्या गोष्टींना अर्थहीन म्हणून झटकून टाकणे आता त्या पक्षातल्या कोणालाच जुळत नाही. कृष्णालाही नाही. संजय सांगतो,

अत्यद्भुतानि ते दृष्ट्वा वासुदेवपुरोगमाः।
दुर्योधनस्य पूजां च दृष्ट्वा व्रीडामुपागमन्।।
९.६०.५४
हतांश्चाधर्मतः श्रुत्वा शोकार्ताः शुशुचुर्हि ते।
भीष्मं द्रोणं तथा कर्णं भूरिश्रवसमेव च।। ९.६०.५५

— त्या साऱ्या अद्भुत गोष्टी पाहून आणि दुर्योधनाचा तो सन्मान पाहून वासुदेवासह त्या सर्वांना लाज वाटली. भीष्म, द्रोण, कर्ण व भूरिश्रवा हे सर्वजण अधर्माने मारले गेले आहेत, हे ऐकून ते शोकार्त झाले.

भीष्म, द्रोण, कर्ण व भूरिश्रवा हे चोघे कौरवाग्रणी अधर्माने मारले गेल्याचे त्या सर्वांनी कोणाच्या तोंडून ऐकले, ते संजयाने स्पष्टपणे सांगितलेले नाही. संदर्भावरून असे दिसते, की दुर्योधनाने कृष्णावर केलेल्या आरोपांमधला त्या चौघांबद्दलचा भाग येथे विवक्षित असून, देवांनी केलेल्या पुष्पवृष्टीत त्या सर्वांना दुर्योधनाच्या आरोपांनाही देवांचा दुजोरा असल्याचे दिसले आहे.

* * *

### कृष्णाचे आत्मसमर्थन

पांडवपक्षाने युद्धात केलेल्या कौरवाग्रणींच्या वधांविषयी आपली सामान्यतः अशी समजूत असते, की त्या वधांमध्ये अधर्म्य काही नव्हतेच; आणि समजा थोडे काही मागेपुढे झाले असे जरी मानले, तरी त्याला कौरवांनी पांडवांना पूर्वी केलेल्या गोष्टी कारणीभूत होत्या. कौरवांनी पूर्वी केलेल्या अपकारांचा जो पाढा कृष्णाने दुर्योधनाला नुकताच वाचून दाखवला होता, त्यामागचा भाव तोच होता. दुर्योधनाच्या 'को नु स्वन्ततरो मया' ह्या भाषणानंतर घडलेल्या अत्यद्भुत गोष्टींवरून पांडव-पक्षातल्या कृष्णासकट सर्वांना आता – क्षणभर का असेना – असंदिग्ध रीत्या जाणवले आहे, की त्या वधांचे ते समर्थन अग्राह्य आहे.

युद्धात विजय मिळवल्याच्या पांडवपक्षाच्या आनंदावर विरजण पडल्याचे कृष्णाला दिसते आहे. आता कृष्ण पांडवपक्षाच्या मदतीला पुन्हा एकदा धावून येतो आणि त्या पक्षाने युद्धात केलेल्या धर्मबाह्य वधांचे आणि त्या वधांमधल्या स्वतःच्या प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष सहभागाचे एक वेगळेच समर्थन पुढे करतो. कृष्णाचे शब्द, नेहमीप्रमाणे, लक्षपूर्वक वाचण्यासारखे आहेत. पांडवपक्षाला कृष्ण म्हणतो,

नैष शक्योऽतिशीघ्रास्त्रस्ते च सर्वे महारथाः।
ऋजुयुद्धेन विक्रान्ता हन्तुं युष्माभिराहवे।। ९.६०.५७
उपाया विहिता ह्येते मया तस्मान्नराधिपाः।
अन्यथा पाण्डवेयानां नाभविष्यज्जयः क्वचित्।।
९.६०.५८

—अतिशय शीघ्रतेने शस्त्र चालवणाऱ्या ह्याला (दुर्योधनाला) आणि त्या (भीष्मादिक) सर्व पराक्रमी महारथ्यांना रणात ऋजुयुद्धाने मारणे तुम्हाला शक्य नव्हते. नराधिपांनो, ह्या कारणाने मी ते सारे 'उपाय' योजले. अन्यथा पांडवपक्षाचा जय झाला नसता, हे निश्चित.

'उपाय' ह्याचा प्रस्तुत संदर्भातला अर्थ आहे, ज्यात काहीतरी लबाडी भरली आहे असा धर्मबाह्य मार्ग.

कृष्ण पुढे म्हणतो,

ते हि सर्वे महात्मानश्चत्वारोऽतिरथा भुवि।
न शक्या धर्मतो हन्तुं लोकपालैरपि स्वयम्।।
९.६०.५९
तथैवायं गदापाणिर्धार्तराष्ट्रो गतक्लमः।
न शक्यो धर्मतो हन्तुं कालेनापीह दण्डिना।।९.६०.६०

– ते चौघेही महात्मे (भीष्म, द्रोण, कर्ण, भूरिश्रवा) ह्या








जगात अतिरथी (म्हणून प्रसिद्ध) होते. धर्माने (युद्ध करून) त्यांना मारणे तर खुद्द लोकपालांनाही शक्य नव्हते. तसेच, युद्धात न थकणारा हा धार्तराष्ट्र (दुर्योधन) गदाहस्त असताना त्याला धर्माने (युद्ध करून) मारणे तर खुद्द दंडहस्त यमालादेखील शक्य नव्हते.

भीष्म, द्रोण, कर्ण, भूरिश्रवा व दुर्योधन ह्या पाचही कौरवाग्रणींचे वध पांडवपक्षाने धर्मबाह्य मार्ग वापरून केले आणि अन्यथा त्यांना विजय मिळणे अशक्य होते, ह्याची पांडवपक्षातल्याच कोणा कथापात्राच्या तोंडची महाभारतातली ही सर्वांत असंदिग्ध शब्दांमधली कबुली आहे.

व्यासांनी हे सारे अशा काही प्रकारे रचले आहे, की त्याकडे, 'दुर्योधनाच्या मथितार्थाकडे पाहता त्याने कृष्णावर केलेले दोषारोप कितपत खरे आहेत?' ह्या लेखात आधी उपस्थित केलेल्या प्रश्नाच्या पार्श्वभूमीवर पाहणे अटळ व्हावे. कृष्णाच्या कबुलीकडे त्या प्रकारे पाहता असे दिसते, की त्याने दुर्योधनावर आधी किती का ठणकावून प्रत्यारोप केले असेनात, दुर्योधनाने कृष्णावर–व पर्यायाने पांडवांवर–केलेले दोषारोप मथितार्थाने खरे होते. फरक एवढाच आहे, की कृष्ण ज्याला आता 'उपाय' म्हणतो आहे त्यालाच दुर्योधन 'जिह्ममार्ग' म्हणाला होता.

कृष्णाच्या तोंडच्या ह्या कबुलीने बसणारा धक्का तर काहीच नाही असा धक्का, कृष्णाने कौरवाग्रणींच्या वधासाठी वापरलेल्या 'उपायां'चे तो आता देत असलेले समर्थन वाचून बसतो. कृष्ण म्हणतो,

न च वो हृदि कर्तव्यं यदयं घातितो नृपः।
मिथ्यावध्यास्तथोपायैर्बहवः शत्रवोऽधिकाः।।
९.६०.६१

– हा राजा (दुर्योधन) (अशा तऱ्हेने) मारला गेला आहे, हे तुम्ही कोणी मनावर घेऊ नका. शत्रू (संख्येने) खूप किंवा (बलाने) अधिक असल्यास ते 'मिथ्यावध्य' असतात व 'उपायां'नी मारायचे असतात.

'मिथ्यावध्य' म्हणजे खोट्यानाट्या प्रकारे मारण्यास योग्य.

'बलवान शत्रू 'मिथ्यावध्य'असतात व त्यांना 'उपायां'नीच मारायचे असते', ह्या त्याच्या नीतितत्त्वाचे कृष्ण आता समर्थन करतो. कृष्ण सांगतो, "असुरांना मारण्यासाठी देवांनी पूर्वी हाच मार्ग वापरला होता. सज्जनांनी अनुसरलेला मार्ग सर्वांनाच अनुसरता येत असतो."

कृष्णाच्या ह्या समर्थनात काय आहे त्या इतकेच काय नाही, ते लक्षात घेण्यासारखे आहे. त्यात आता, कारण म्हणून कौरवांनी पांडवांना पूर्वी केलेल्या गोष्टी नाहीत, की आपला पक्ष धर्माचा आहे व विरुद्धपक्ष अधर्माचा आहे, हे नाही. तसेच, ते समर्थन कोठल्याही प्रकारच्या तत्त्वज्ञानावर आधारलेले नाही. कृष्णाचा येथील मथितार्थ असा : आपला जय होण्यासाठी आपण कौरवाग्रणींचे वध केले, आणि ते वध धर्म्य मार्गांनी करणे अशक्य होते म्हणून त्या वधांसाठी आपण धर्मबाह्य मार्ग वापरले, हे खरे आहे; तथापि, जयासाठी शत्रूशी हे असेच वागायचे असते.

कृष्णाचा हा 'योग' जगरहाटीला धरून आहे. त्यात 'यतो धर्मस्ततो जयः' असले थेट आभाळाला भिडणारे काही नाही एवढेच.

कृष्णाने बलरामाशी केलेले 'धर्मच्छल' किती वेगळे होते!

भाषणाचा शेवट म्हणून कृष्ण त्या सर्वांना म्हणाला, की आपण कृतकृत्य झालो आहोत. आता शिबिरात जाऊन आपण सर्वजण विश्रांती घेऊया.

"देवांनी 'उपाय' वापरले म्हणून आपणही 'उपाय' वापरू शकतो", हे नीतितत्त्व आपण कौरवांनी द्यूतात केलेल्या बनवाबनवीला लावायला तयार आहोत का, असले अनाठायी प्रश्न तेथे कोणालाही सुचलेले नाहीत. संजय सांगतो, की आपल्या पक्षाच्या कृतीचे ते समर्थन ऐकून पांडवपक्षातल्या सर्वांना अतिशय आनंद झाला. मग, मांड्या मोडून धुळीत पडलेल्या मरणोन्मुख दुर्योधनाला रणांगणात तसाच पडू देऊन ते सर्वजण हर्षाने शंख फुंकीत व सिंहनाद करत आपल्या शिबिरांकडे परतले.

येथे गदायुद्धानंतरचे वादंग संपते आणि साठावा अध्याय संपतो. कथेचा ओघ मग दुर्योधनवधातल्या अधर्माचा अश्वत्थाम्याने उगवलेल्या सूडाकडे वळतो.[१७]

* * *

## परिशिष्ट

अनुक्रमणिका

लेखात विवेचिलेल्या अध्यायांमध्ये, दुर्योधनाची मांडी फोडण्याच्या भीमाच्या प्रतिज्ञेशी विसंगत असलेल्या काही गोष्टी वाचकाच्या नजरेस आणून देणे, हा प्रस्तुत परिशिष्टाचा उद्देश आहे. येथील माहिती, दुर्योधनाची मांडी फोडण्याची भीमाची प्रतिज्ञा, (२.६३.१४), आणि भीम युद्धात तुझ्या मांड्या गदेने फोडेल असा मैत्रेय ऋषींनी दुर्योधनाला दिलेला शाप, (३.११.३४), ह्यांवर डॉ. मेहेंदळ्यांनी लिहिलेल्या एका वाचनीय लेखावर आधारलेली आहे : (५, पृ. २६६-२८५). बरेच दाखले दिलेल्या त्या लेखाचा सारांश असा : भीमाची ती प्रतिज्ञा आणि मैत्रेयांचा तसा शाप ह्या दोन्ही गोष्टी महाभारताच्या संहितेत मागाहून घालण्यात आल्या आहेत; आणि त्या घालण्यामागचा उद्देश, गदायुद्धात दुर्योधन आपल्याला आटपत नाही हे दिसल्यावर भीमाने स्वतःला वाचवण्यासाठी दुर्योधनाच्या मांड्या फोडून केलेल्या अधर्माचरणातला दोष कमी व्हावा–किंबहुना, तो दोष ठरूच नये–हा आहे. येथे उल्लेखिलेल्या विसंगतींबरोबरच, दुर्योधनाला ठार मारण्याचे भीमाव्यतिरिक्त इतर योद्ध्यांनीही नेटाचे प्रयत्न केल्याचे संहितेत आहे, असे मेहेंदळ्यांनी दाखवले आहे. दुर्योधनाच्या मस्तकावर पाय ठेवण्याची भीमाची प्रतिज्ञा संहितेत मागाहून घातली असल्याचे लेखात एका तळटीपेत येऊन गेले आहे.

विसंगत गोष्टींची यादी –

१) राज्यावरचा हक्क सोडून दुर्योधन वनात निघून जायला तयार असताना त्याला 'क्षत्रियांनी दान स्वीकारायचे नसते', हा धर्मदंडक उद्धृत करून युधिष्ठिर दुर्योधनाचे ते म्हणणेही धुडकावून लावतो त्या प्रसंगी, (९.३०.५१-५४), 'तुला' असा सोडून दिला तर भीमाच्या प्रतिज्ञा अपुऱ्या राहतील आणि तो नरकात जाईल', हे युधिष्ठिराच्या तोंडी असायला हवे होते. तथापि, भीमाच्या प्रतिज्ञांचा संहितेत तेथे उल्लेख नाही. तसेच, त्या प्रसंगाविषयी पुढे अर्जुनाशी बोलताना कृष्ण म्हणतो, की 'दुर्योधन चांगला राज्यावरचा हक्क सोडून वनात जायला निघाला होता; अशा परिस्थितीत कोण प्राज्ञ माणूस त्याला रणात द्वंद्वासाठी आव्हान देईल बरे?' (९.५७.१४-१५). पण युधिष्ठिराने दुर्योधनाला वनात जाऊ दिले असते, तर भीमाच्या प्रतिज्ञा अपुऱ्या राहिल्या असत्या हे कृष्णाला सुचलेले नाही, आणि अर्जुनानेही त्याच्या लक्षात आणून दिलेले नाही.

२) 'आम्हा पाच पांडवांपैकी तुला हवे त्याच्याशी तू गदायुद्ध कर आणि त्यात तू जिंकलास तर कुरुराज्य तुझे!' (९.३१.५१-५२) हे दुर्योधनाला म्हणताना, त्याने जर भीमाला निवडले नाही, तर मग भीमाच्या प्रतिज्ञा अपुऱ्या राहतील हा विचार युधिष्ठिराला सुचलेला नाही. त्याविषयी युधिष्ठिराशी 'संक्रुद्ध' होऊन बोलताना कृष्णाच्याही तोंडी, 'आता दुर्योधनाने जर भीमाला निवडले नाही, तर भीमाच्या प्रतिज्ञा कशा पुऱ्या व्हायच्या?' असले काही नाही (९.३२.२-१४).

३) 'मी दुर्योधनाला मारतो', असे कृष्णाला म्हणताना भीमाच्या तोंडी त्याच्या प्रतिज्ञेचा उल्लेख नाही.

४) 'तू द्रौपदीला दाखवलेली मांडी मी आता फोडतो', असले काही भीमाच्या आव्हानात नाही, आणि 'असेल हिम्मत तर मी द्रौपदीला दाखवलेली ही माझी मांडी फोडून दाखव', असले काही दुर्योधनाच्या प्रत्याह्वानात नाही. तुलना म्हणून, युद्धाला प्रारंभ होण्याच्या आदल्या रात्री दुर्योधनाने उलूकाबरोबर पांडवांना पाठवलेला निरोप लक्षात घेण्यासारखा आहे. दुःशासनाचे रक्त पिण्याच्या भीमाच्या प्रतिज्ञेविषयी त्यात भीमाला, 'असेल हिम्मत तर दुःशासनाचे रक्त पिऊन दाखव', हे आव्हान पुनःपुनः देण्यात आले आहे. पाहा : (५.१५७.१८;१५८.१०;१५९.१२).

५) भीम मार खात असल्याचे पाहिल्यावर, भीमाने त्याची प्रतिज्ञा पार पाडावी असे कृष्णाने अर्जुनाला सांगितले आहे (९.३२.२४). प्रतिज्ञापालन हा क्षात्रधर्माचा भाग होता हे लक्षात घेता, मांडी फोडायच्या भीमाच्या प्रतिज्ञेची त्याला आठवण करून द्यायला लागावी, हे सुसंगत नाही. तसेच, कृष्णाने त्याच्या भाषणात प्रतिज्ञापालनावर भर न देता 'अन्याय' वापरण्याच्या आवश्यकतेवर भर दिला आहे, हेदेखील सुसंगत नाही.

६) दुर्योधनाने 'अवस्थान' हा डावपेच वापरणे मांड्या फोडण्याच्या भीमाच्या प्रतिज्ञेशी विसंगत आहे.

७) दुर्योधनाच्या मांड्या फोडण्याची भीमाची प्रतिज्ञा संहितेत पहिल्यापासून असती, तर ती बलरामालाही माहीत असती आणि मग भीमाने दुर्योधनाच्या मांड्या फोडल्यानंतर त्याने इतका गहजब केला नसता.

हे सारे लक्षात घेता ती प्रतिज्ञा मागाहून घातली आहे हे पटावे.

* * *

## संदर्भसूची

1. Ganguli, K. M, The Mahabharata of Krishna-Dwaipayana Vyasa, Translated into English Prose from the Original Sanskrit Text, 12 Vols., Munshiram Manoharlal, New Delhi, 1998. (हे बंगालमध्ये प्रचलित असलेल्या पाठाचे भाषांतर आहे.)

2. Smith, John D, The Mahabhrata, An abridged translation, Penguin Books, London and New York, 2009.

3. Sukthankar, V. S., et. al., (ed.), The Mahabharata for the first Time Critically Edited, 19 Vols., Bhandarkar Oriental Research Institute, Pune, 1933-1966.

४) जातेगांवकर, अ. वि., आणि जातेगांवकर वा. अ., कौरवपांडवांमधले द्यूत : युधिष्ठिराचे उत्तरदायित्व, नवभारत, सप्टेंबर व ऑक्टोबर, २०११.

५) मेहेंदळे, म. अ., प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती, प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई, २००१

* * *

## संदर्भटीपा –

१. भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर ह्या पुण्याच्या संस्थेने महाभारताची संशोधित आवृत्ती संपादित केली आहे. पाहा : [३]. प्रस्तुत लेख त्या आवृत्तीवर आधारला असून, महाभारतातली म्हणून लेखात उद्धृत केलेली सर्व अवतरणे त्या आवृत्तीमधून घेतली आहेत. लेखात दिलेली भाषांतरे, संदर्भ म्हणून वापरलेल्या [१,२] ह्या भाषांतरांना सामान्यतः धरून आहेत.

२. युधिष्ठिराने प्रस्तुत प्रसंगी दुर्योधनाला दिलेल्या मुभांच्या संदर्भात जुगार-द्यूत-हा शब्द कृष्णाच्या तोंडचा असून कृष्णाचे ते शब्द, (९.३२.७), लेखात पुढे उद्धृत केले आहेत. युधिष्ठिराच्या जुगारी वृत्तीविषयी अधिक माहितीसाठी पाहा : [४].

३. द्यूतात राज्य घालवण्यावरून पांडवांनी युधिष्ठिराला दोषी धरले असलेल्या विविध प्रसंगांसाठी पाहा : (४).

४. महाभारताचे अनेक प्रादेशिक पाठ आहेत. त्यांतल्या महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या (नीलकण्ठी) पाठात असलेला प्रस्तुत श्लोक संशोधित आवृत्तीच्या संहितेत नाही. तथापि, कृष्णाचा उद्वेग त्यात सुंदर भाषेत व्यक्त केला आहे असे वाटल्याने तो श्लोक येथे उद्धृत केला आहे. पाहा : (३,खंड ११, पृ. २४३).

५. संहितेत पहिल्या नियमाचा स्पष्ट शब्दांमध्ये उल्लेख आहे. पाहा : (९.५९.६), (११.१३.१७-१९). तसेच, प्रस्तुत प्रसंगी पुढे अर्जुनाने भीमाला केलेल्या खुणेत, (९.५७.१८), आणि कथेत पुढे भीमाने गांधारीला दिलेल्या कबुलीत (११.१४.१-१०), तो नियम अध्याहृत आहे. दुसऱ्या नियमाचा व पुढल्या परिच्छेदात दिलेल्या इतर गोष्टींचा संहितेत स्पष्ट शब्दांमध्ये उल्लेख नाही. प्रस्तुत युद्धात घडलेल्या घटनांवरून लेखकांनी बांधलेली ती अनुमाने आहेत.

६. कथेत पुढे आलेले कृष्णाच्या तोंडचे (९.६०.५७-६२) हे श्लोक पाहा.

७. दुर्योधनाच्या मांड्या फोडण्याविषयी, त्या गदायुद्धात घाबरून मी स्वतःला वाचवण्यासाठी ते केले, अशी कबुली पुढे स्त्रीपर्वात भीमाने गांधारीजवळ स्पष्ट शब्दांमध्ये दिली आहे. पाहा : (११.१४.२-३)

८. भीम दुर्योधनाच्या मस्तकात लाथा घालतो, हा प्रसंग रचला जात असताना जर त्याविषयीची भीमाची प्रतिज्ञा कथेत असती, तर तिचा येथे नक्कीच उल्लेख आला असता. तथापि, त्या प्रतिज्ञेचा उल्लेख शल्यपर्वात येथे नाही; एवढेच नव्हे तर भीमाच्या त्या कृत्यातला धर्म-अधर्म ह्यावरून कृष्ण व युधिष्ठिर ह्यांच्यामध्ये पुढे दोन शब्द झाले आहेत, तेथेही नाही. ह्या सर्व गोष्टींवरून हे उघड आहे, की भीमाच्या त्या कृत्यातल्या अधर्मावर सफेती लावण्यासाठी ती प्रतिज्ञा सभापर्वात मागाहून घुसडण्यात आली आहे. (हे टिपण नवे आहे).

९. महाराष्ट्रात प्रचलित असलेल्या (नीलकण्ठी) पाठात रचनाकारांनी येथे अधिक श्लोक घालून वेगळा भाव आणायचा प्रयत्न केला आहे. पाहाः [१, खंड ११,पृ.४२२-३].

१०. "कलियुग जवळ आले आहे म्हणून आता अधर्म

अनुक्रमणिका

चालायचाच", हे स्पष्टीकरण कौरवांनी द्यूतात केलेल्या कृत्यांना लावण्याची कृष्णाची तयारी उघडच नाही.

११. भीमाची प्रतिज्ञा व मैत्रेयांचा शाप ह्या–लेखास जोडलेल्या परिशिष्टात दाखवल्याप्रमाणे, संहितेत मागाहून घालण्यात आलेल्या–गोष्टी वगळल्यास कृष्णाच्या भाषणात एकच मुद्दा उरतो–आत्मवृद्धी. वेगळ्या शब्दांमध्ये सांगायचे तर–स्वार्थ.

१२. आपण राज्यलोभाने कुलक्षय होऊ दिला ह्यावरून युधिष्ठिराला मोठा पश्चात्ताप झाला आहे; पण, तो कथेत येथे–केवळ कौरवांचा निर्वंश होण्याबरोबर–नसून पुढे पांडवांचाही निर्वंश झाल्यानंतर आहे. युधिष्ठिराच्या येथील शब्दांमध्ये पश्चात्ताप नसून स्वत:विषयी कीव व सद्य:परिस्थितीविषयी कडवटपणा एवढेच आहे.

१३. आम्ही पाहिलेल्या सर्व भाषांतरांमध्ये 'स्मृतिं मिथ्या प्रयच्छता' ह्या दुर्योधनाच्या शब्दांचा भीमाच्या प्रतिज्ञेशी संबंध लावला आहे. येथील अर्थ, अर्जुनमिश्र ह्यांच्या प्राचीन टीकेतल्या 'स्मृतिं संज्ञाम्' ह्या संशोधित आवृत्तीत उल्लेखलेल्या अर्थाला व (१, खंड ११, पृ. ५००) येथील सूचनात्मक प्रश्नाला धरून आहे.

१४. द्युतातील युधिष्ठिराच्या उत्तरदायित्वाविषयी महाभारत काय सांगते त्यासाठी पाहा : (४)

१५. स्वन्ततर = सु+अन्त+ तर= अधिक चांगला अंत.

१६. दुर्योधनाच्या तोंडच्या येथील श्लोकांत व्यासांनी गुंफलेले 'को नु स्वन्ततरो मया' हे धृपद अर्थपूर्ण आहे. तसे धृपद वापरणे हे नाट्याचे शिखर आल्याचे वाचकाला दर्शवण्याचे व्यासांचे एक साधन असून त्याचा ते फार क्वचित उपयोग करतात. तशा धृपदाची दुसरी सर्वपरिचित उदाहरणे : भीष्मपतनाच्या वेळचे 'नेमे बाणा: शिखन्डिन:'-–हे बाण शिखंडीचे नव्हते–ह्या धृपदाचे भीष्मांचे भाषण; कर्णवधाच्या वेळी 'क्व ते धर्म: तदा गत:'–तेव्हा तुझा धर्म कोठे गेला होता?–हे धृपद वापरून कृष्णाने कर्णाला विचारलेला मर्मभेदी प्रश्न.

१७. दुर्योधनवधावर आम्ही एक विस्तृत लेख लिहिला असून तो पुस्तकाच्या स्वरूपात लवकरच प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे. प्रस्तुत लेख त्या लेखाच्या एका भागावर आधारलेला आहे.

❀❀❀

---

# कलाकृतीचा अर्थ आणि आस्वादकाचे आकाश

सुनिल गोपाळ मराठे

या टिपणीला सुरुवात करण्यापूर्वी मला एक गोष्ट अधोरेखित करावीशी वाटते ती ही : या टिपणीमधली 'आकाश आणि काळ', तसेच 'जाणिवेच्या' संदर्भातील विधाने काटेकारेपणे qualify करण्याची गरज आहे. पण मी तसे करत बसलो असतो, तर टिपणी बरीच मोठी झाली असती. त्यामुळे broad strokes मधून आपण आपली भूमिका पुढे ठेवायची, असे ठरवून मी ही टिपणी लिहिली आहे. त्यामुळे माझ्या भूमिकेविषयी गैरसमज होऊ शकतील, अशा जागा या टिपणीत निश्चितच आहेत. पण मी आखून घेतलेल्या मर्यादेत हे टाळता येणे शक्य नव्हते.

ज्येष्ठ समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णींच्या बरोबर कलाकृतीच्या अर्थाच्या संदर्भात चर्चा करता असताना दभिंनी असे विधान केले, की

'कलाकृतीत घटकांचे संघटन म्हणजे कलाकृतीचा अर्थ व कलाकृतीतील घटकांचे हे संघटन सतत बदलत असते.'

नंतर ते असेही म्हणाले, की

'वाङ्मयकृतीचे लेखन पूर्ण झाले, की मग तिची निर्मितिप्रक्रिया सुरू होते. आश्चर्य म्हणजे ही प्रक्रिया अखंड सुरूच असते. तिच्यातील काही घटक वाढत असतात, काही मोडत असतात, काही नष्ट होत असतात. हीच तर तिच्या जिवंतपणाची खूण असते. असे का घडते? वाङ्मयकृतीत अनेक घटक असतात, त्या घटकांचे व्यूह असतात. अशा अनेक घटकांचा व्यूह म्हणजे साहित्यकृती.'

(वर अवतरणात, दभिंचे म्हणून लिहिलेले शब्द, त्यांच्या बरोबर चर्चा करत असताना मी लिहून घेतलेले होते. ते मी नंतर त्यांना वाचून दाखवून, तपासून घेतलेले आहेत.)

ही भूमिका मला पटलेली आहे, पण दभिंना अभिप्रेत असलेल्या या भूमिकेमागचे त्यांचे सर्व विचार व त्या विचारांची सर्व implications मला कळलेली आहेत, असे मी म्हणणार नाही. याचे कारण असे, की 'कलाकृतीतील घटकांचे संघटन' हे एक वास्तव आहे असे म्हटले, तर हे वास्तव 'वस्तुनिष्ठ आहे, का अनुभवनिष्ठ आहे, का त्याचे स्वरूप हे अनुभूतीचे आहे', याविषयीची दभिंची भूमिका व त्या भूमिकेमागची त्यांची तार्किकता (लॉजिक) मला नीट समजलेली आहे, असे मला वाटत नाही. याविषयी त्यांच्याबरोबर अनेक चर्चा झाल्या. त्यावरून माझ्या असे लक्षात आले, की जरी मला दभिंची भूमिका पटत असली, तरी मी विज्ञान व इंजिनियरिंग शाखेकडून आलेला माणूस असल्याने की काय, पण माझे विचार नुसतेच वेगळ्या मार्गावरून प्रवास करतात असे नाही, तर काहीशा वेगळ्या वैचारिक परिसरात ते जगत असतात, फिरत असतात, विकास पावत असतात.

यासंबंधीचे माझे विचार मी एखाद्या टिपणीमधून पुढे ठेवले, तर ते जास्त सुसंगतपणे मांडले जातील व माझ्या मनाशीसुद्धा ते जास्त स्पष्ट होतील, असे वाटल्याने मी ही टिपणी लिहिली आहे. 'कलाकृतीचा अर्थ' या संकल्पनेविषयीचा विचार ज्या वैचारिक परिसरात मी करतो आहे, त्या वैचारिक परिसराविषयी या टिपणीत मी मुख्यत्वेकरून लिहिले आहे.

कलाकृतीतील विविध घटकांचे संघटन म्हणजे कलाकृतीचा अर्थ व या घटकांच्या संघटनेत सतत बदल होत असतो, इथून मी मांडणीला सुरुवात करतो.

१) आपण जर कलाकृतीतील घटकांच्या आत, जणूकाही डोकावून पाहिले, तर अगदी प्रत्येक घटकाला नसले, तरी सर्व महत्त्वाच्या घटकांना internal structure असल्याचे आपणाला दिसून येईल, असे मला वाटते. या internal structure मुळेच प्रत्येक घटकाला स्वतंत्र अशी ओळख प्राप्त होत असते व त्याचे वेगळेपण कलाकृतीच्या एकूण संघटनेमध्ये प्रस्थापित

अनुक्रमणिका

होत असते. 'कलाकृतीचा अर्थ' या संकल्पनेच्या संदर्भात, या घटकांतर्गत असलेल्या संघटनेतही विकास आणि ऱ्हास होण्याची शक्यता आपण गृहीत धरायला पाहिजे. या साऱ्याचा अर्थ मी असा लावतो, की 'कलाकृतीतील घटकांचे संघटन' हे hierarchical आहे. हे फार महत्त्वाचे आहे.

२) 'अर्थ आणि संघटन' या दोन्हीही संकल्पनांना थोडावेळ काहीसे स्वतंत्र व अलग ठेवून त्या दोन्हींकडे मी काहीशा साहित्यबाह्य दिशांनी व अंगांनी येणार आहे. ('काहीशा' हा शब्द मागच्या वाक्यात मी मुद्दामच वापरला कारण साहित्याला, तसे पहायला गेले, तर कुठलाच विषय वर्ज्य नसतो. असो.) तर अशा प्रकारे या संकल्पनांकडे येण्यामुळे 'अर्थ' व 'संघटन' या संकल्पनांना जो काही अधिक अर्थ प्राप्त होईल, तो 'अर्थ' नंतर मला 'कलाकृतीचा अर्थ' यातील 'अर्थाशी' जोडून घ्यायचा आहे आणि हे सर्व विविध 'अर्थ', एकाच continuum चे भाग आहेत, अशी भूमिका समांतरपणे घ्यायची आहे. 'अर्थ आणि संघटन' या संकल्पनांच्या विचाराला सुरुवात मी अर्थापासून करतो.

३) 'अर्थ' ही संकल्पना फार मूलभूत आहे आणि या संकल्पनेला 'कलाकृतीचा अर्थ' यातील 'अर्थापुरते' मर्यादित ठेवून, तिचा त्या मर्यादेत विचार करण्याचे काहीच कारण मला दिसत नाही.

जीवन अर्थपूर्ण आहे असे आपणाला अनुभवाला येते, तेव्हा अनुभवाला येणारा 'अर्थ' आणि कलाकृतीचा 'अर्थ' हे एकाच स्वरूपाचे अर्थ आहेत आणि म्हणूनच एखाद्या श्रेष्ठ कलाकृतीचा जेव्हा आपणाला अर्थ लागतो, तेव्हा जीवनात एक वेगळाच अर्थ आपणास सापडतो, जीवनाकडे बघायची एक नवी दृष्टीही त्याच वेळी आपणास प्राप्त होते. हे असे होते, कारण कलाकृतीचा 'अर्थ' लागण्यामध्ये जी अर्थनिर्मितीची प्रक्रिया कार्यरत असते, तीच प्रक्रिया आपणाला जीवन जेव्हा अर्थपूर्ण वाटते, तेव्हा कार्यरत झालेली असते आणि आपणाला एखाद्या कलाकृतीचा अर्थ लागत नाही किंवा जीवन अर्थशून्य भासते, तेव्हा हीच प्रक्रिया कार्यरत व्हायची थांबलेली असते.

मी इथे कुठल्याही विशिष्ट अर्थाविषयी बोलत नाही आहे, हे मला अधोरेखित करायचे आहे. मी एका 'प्रक्रिये' विषयी बोलतो आहे.

४) आता मी 'अर्था'कडे अजून एका वेगळ्या दिशेने येतो. 'अर्थ' मानवी जीवनात काय कार्य करतो, असा प्रश्न उपस्थित करून त्याचे मला जाणवणारे व दिसणारे उत्तरही देतो. 'अर्थ' हे माणसाच्या मनाचे अन्न आहे.

मनाचे पोषण कशामुळे होते, तर ते अर्थामुळे होते. मनाची भूक कशाने भागते, तर ती अर्थामुळे भागते. अर्थ हेच मनाचे अन्न आहे. माझी इथली भूमिका ही 'जणूकाहीची' नाही. अर्थ हे जणूकाही मनाचे अन्नच असते, असे मी म्हणत नाही. मनाचे अन्न कुठले या प्रश्नाला मी सरळ उत्तर दिले तर ते, 'अर्थ' असेच असेल.

एका पातळीवर माझी भूमिका ही व्याख्येच्या स्वरूपाची आहे. ज्याने भूक भागते ते 'अन्न', अशा व्याख्येपासून मी सुरुवात करतो. या अर्थाने मी 'अन्न' हा शब्द वापरणार आहे, पण मी इथेच थांबणार नाही आहे. इथून मी पुढे जाणार आहे, आणि मी जिथे जाणार आहे, तो भाग नुसता व्याख्येचा नाही. अन्न ही गोष्ट अशी असते, की जिने नुसती भूकच भागत नाही, तर देहाचे वा मनाचे पोषण होते; देहाचा, मनाचा विकास होतो, मन उत्क्रान्त होते. अन्नाने मनाची नुसतीच भूक भागत नाही, तर नंतर खोटी भूकही लागत नाही. वखवख निर्माण होत नाही. अन्न चावून खाऊन पचवल्यानंतर खोटी भूक न लागणे, वखवख निर्माण न होणे, हे अन्नाच्या अन्नपणाचे खरे लक्षण आहे.

चंगळवादात हे पाहिजे, ते पाहिजे, तेही पाहिजे अशा वखवखीत, दलदलीत माणसाचा पाय खोलखोल रुजत जातो; कारण मनाला पुरवले जाणारे अन्न हे खरे अन्न नसते आणि समजा, मनाला खरे अन्न पुरवले, तरी ते चावून खाऊन पचवण्याइतका चंगळवादी माणसापाशी वेळ आणि धीर नसतो. पुढून कोणतरी खुणावत असते, बोलावत असते. जागेवर पाय ठरत नाही. रोपटे सारखे उपटून पाहिले तर वृक्ष सोडाच, पण साधे झाडसुद्धा निर्माण होत नाही.

माणसाचे माणूस म्हणून जर काही वेगळे अन्न









असेल, तर ते म्हणजे 'अर्थ'. 'अर्थाला' त्याचे पोषणमूल्य कशामुळे प्राप्त होत असेल, तर ते संघटनेमुळे. संघटन म्हणजे Order. आता मी Order ही संकल्पना पकडून पुढे जाणार आहे.

५) 'Order' या संकल्पनेकडे मी जर आधुनिक विज्ञानाकडून आलो, तर असे दिसून येते, की 'Order' आणि 'Disorder' यांच्या नातेसंबंधातून काळाची निर्मिती होते. याचा अर्थ असा आहे, की संघटन आणि विघटन हे काळात घडत नसून, संघटन आणि विघटन हे प्राथमिक आहेत व त्यांच्या नातेसंबंधातून काळाची निर्मिती होत आहे. (किंवा असेही म्हणता येईल, की 'Order' आणि 'Disorder' यांच्या अनुभवातून काळाची निर्मिती होत आहे. या दोन गोष्टी वेगळ्या आहेत किंवा असण्याची शक्यता आहे. पण या चर्चेत मी आता उतरणार नाही.)

संघटन हे सारखे बदलत असते, असे जेव्हा आपण सुरुवातीला म्हटले, त्या बदलात काळ हा आलाच. पण कलाकृतीतील घटकांच्या संघटनेत बदल होण्यासाठी वा झालेले बदल अनुभवास येण्यासाठी आवश्यक असलेली निरपेक्ष प्रवाहाची पार्श्वभूमी पुरवण्यापुरताच काळाचा सहभाग या बदलात असतो का, हा महत्त्वाचा प्रश्न आहे.

आधुनिक सापेक्षतावाद जेव्हा म्हणतो, की काळ व आकाश (स्पेस) हे absolute नाहीत, तेव्हा त्यांच्या absolute नसण्यात त्यांच्या एकमेकसापेक्ष असणाऱ्या स्वभावाचे सूतोवाच झालेले आहे. काळ हा शुद्ध पाण्यासारखा नाही, की जो दिला तो रंग घेईल. काळाला स्वत:चे, जणूकाही रंगरूप आहे आणि याहून जास्त महत्त्वाचे म्हणजे आकाशाला (स्पेसला) स्वत:चा आकार आहे.

काळाला स्वत:चे असे एक 'असलेपण' आहे, आकाशाला (स्पेसला) स्वत:चा आकार आहे, याची कलाकृतीच्या अर्थाच्या संदर्भात असणारी implications फार गंभीर आहेत.

कलाकृतीच्या घटकांचे संघटन ज्या आकाशात घडत असते, त्या आकाशाला स्वत:चा आकार असतो. त्यामुळे या आकाशात संघटन निर्माण होत असताना, कलाकृतीचे घटक त्यांना पाहिजे तो 'आकार' घ्यायला पूर्ण स्वतंत्र नसतात. तसेच त्यांना पाहिजे त्या वेगाने बदल घडवायला कलाकृतीतले घटक काळापासून मुक्तही नाहीत. आकाश आणि काळ हे या घटकांचे अविभाज्य भाग आहेत. आकाशाचा आकार व काळाचे 'असलेपण', हे कलाकृतीच्या घटकांच्या घडत असणाऱ्या व सतत बदलत असणाऱ्या संघटनेवर व पर्यायाने कलाकृतीच्या 'अर्थावर' परिणाम करत असतात.

जाणिवेचे महत्त्व विज्ञानाला हळूहळू पण निश्चितपणे जाणवायला लागले आहे. त्याचप्रमाणे आधुनिक विज्ञानाला आकाश आणि काळ यांविषयी काय म्हणायचे आहे, ते काय म्हणते आहे, याची कलाक्षेत्रातील विचारांची दखल घेण्याची गरजही आता निश्चितच उत्पन्न झाली आहे. ज्या आकाशात चंद्रसूर्यतारे आहेत, हे घर, समोरचा डोंगर आणि झाड आहे त्याच आकाशात माझे विचार आहेत, माझ्या भावना आहेत. मागील वाक्यात 'असण्याच्या' ठिकाणावर मला वाचकाचे लक्ष वेधायचे आहे; जे काही आहे त्याच्या स्वरूपावर नाही.

६) जनरल थियरी ऑफ रिलेटिव्हिटीमध्ये, मॅटरमुळे आकाशाला आकार प्राप्त होत असतो आणि आकाशाला प्राप्त झालेल्या आकारामुळे, मॅटर कुठे व किती वेगाने जाणार हे ठरत असते. मॅटर हे ग्रह, तारे, धूमकेतू अशा कुठल्याही स्वरूपात असू शकते.

आकाशाचा आकार ठरविण्यात जे कार्य, सापेक्षतावादात मॅटर करते तेच कार्य कलाकृतीच्या संदर्भात आस्वादक करतो.

कलाकृतीच्या घटकांचे संघटन ज्या आकाशात घडते, त्या आकाशाचा आकार ठरवण्यात, **'आस्वादकाचा' सहभाग** असतो. आस्वादकाच्या असण्याचा परिणाम, कलाकृतीच्या घटकांचे संघटन ज्या आकाशात घडते, त्याचा आकार बदलण्यात होत असतो आणि एवढेच नव्हे, तर प्रत्येक आस्वादक हा आकार वेगवेगळ्या प्रकारे बदलत असतो.

"वाङ्मयकृतीचे लेखन पूर्ण झाले, की मग तिची निर्मितिप्रक्रिया सुरू होते व ही प्रक्रिया अखंड सुरूच असते." दभिंच्या या भूमिकेचा अर्थ मी कशा प्रकारे लावतो ते आता मला स्पष्ट करता येईल. कलाकृतीचे

अनुक्रमणिका

लेखन पूर्ण झाले, की लिखित संहितेच्या पातळीवर कलाकृतीत कुठले घटक[२] असणार आहेत, हे निश्चित होते[२]. पण कलाकृतीची खरी निर्मिती ही, अर्थनिर्मितीच्या पातळीवर होत असते व ही निर्मिती कलाकृतीतील घटक कुठले, हे निश्चित झाल्यानंतर होते व ती आस्वादकाच्या[३] मनात होते. मी इथे घेत असलेल्या भूमिकेतून मला असे अभिप्रेत आहे, की कलाकृतीच्या घटकांचे संघटन, म्हणजेच कलाकृतीचा अर्थ हा आस्वादकसापेक्ष असतो. म्हणजेच तो वस्तुनिष्ठ नसतो आणि 'अर्थ' हे जर का माणसाच्या मानसिकतेचे, माणूसपणाचे पोषण करणारे अन्न असेल, तर कलाकृतीचा अर्थ वस्तुनिष्ठ नसण्यातच त्याच्या पोषकतेचे मर्म आहे.

७) चंगळवादात, वस्तुनिष्ठतेतील 'वस्तूला' अतिशय महत्त्व मिळत जाते. चंगळवादातील 'वस्तू' ही पैसे टाकून, पैसे फेकून विकत घेता येते, विकत घेतली जाते.

पैशाने अमृत जसे विकत घेता येते, तितक्याच सहजतेने विषही विकत घेता येते. पैसा हा रमीतील जोकरसारखा आहे. हा कुठेही, काहीही बनून बसतो. कारण पैसा हा अमूर्त आहे. वस्तू ही विशिष्ट आहे, मूर्त आहे.

चंगळवादात अमूर्त पैसा, विशिष्ट अशा 'पूर्ण मूर्ततेला' विकत घेऊ पाहतो. इथे चंगळवादातील, पर्यायाने चंगळवादाला आधारभूत असलेल्या वस्तुनिष्ठतेतील मूल्यात्मक घसरण्याची बीजे आहेत. वस्तुनिष्ठतेत मूल्यात्मक घसरण ही built in आहे. अतिरिक्त वस्तुनिष्ठतेचे प्रेम हे, बिनचूकपणे माणसाला चंगळवादाकडे घेऊन जाते. मला जो चंगळवाद इथे अभिप्रेत आहे तो, मोटारी, टीव्हीसारख्या वस्तू विकत घेण्यात रममाण होणाऱ्या माणसाचा चंगळवाद नाही; तर 'अर्थ' निर्मितीत कुठलही श्रम खर्च न करणारा, 'अर्थ' निर्मितीत कुठलाही कार्यशील सहभाग न घेता, तयार 'अर्थ' विकत घेण्यात रमणाऱ्या आस्वादकांचा चंगळवाद अभिप्रेत आहे. तयार 'अर्थ' हा नेहमीच माहितीस्वरूपी असतो आणि म्हणून तो विकायला ठेवता येतो, विकतही घेता येतो. या माहितीस्वरूपी 'अर्थावर' समाधान पावणारा 'आस्वादक' हा चंगळवादी असतो. हा खरा आस्वादक नव्हेच. ही माहितीची फळी त्याच्या पायाखालून काढून घ्या, की या 'आस्वादकाच्या' तथाकथित 'आस्वादकतेला' घरघर लागलीच म्हणून समजा.

८) मी वर म्हटले, की वस्तुनिष्ठतेत (objectivity मध्ये) मूल्यात्मक घसरण ही (built in) आहे; तर याच्या उलट, याच्या दुसऱ्या टोकाला असलेल्या व्यक्तिनिष्ठतेत (subjectivity मध्ये) वस्तूचा ऱ्हास आहे. वस्तूचा ऱ्हास आहे, कारण व्यक्तिनिष्ठतेत संघटनेचा ऱ्हास आहे, विघटनाची सुरुवात आहे. व्यक्तिनिष्ठतेत संघटनेचा ऱ्हास आहे कारण संघटन, विशेषकरून कलाकृतीच्या अर्थाच्या संदर्भातले संघटन ही नवनिर्मिती आहे व नवनिर्मिती ही फक्त polar opposite असलेल्या तत्त्वांच्या नात्यामधूनच होते. स्त्रीतत्त्व-स्त्रीतत्त्वाच्या नात्यांमधून वा पुरुषतत्त्व-पुरुषतत्त्वच्या नात्यांमधून नवनिर्मिती होत नाही. वस्तुनिष्ठतेतून वा व्यक्तिनिष्ठतेतून कलेच्या अर्थाची नवनिर्मिती होत नाही. ज्या कार्यामध्ये वा ज्या नात्यामध्ये या दोन्हीही निष्ठांचा विलय होतो, अशा नात्यामधूनच कलेच्या अर्थाची नवनिर्मिती होते.

कलेचा अर्थ हा अनुभूतिस्वरूपी असल्यामुळे तो कुठल्याही स्थानात बद्ध नसतो. व्यक्तीला 'व्यक्तीपण' ज्या स्थानातल्या जाणिवेच्या बद्धतेमुळे मिळते, त्या स्थानात कलेचा अर्थ बद्ध नसतो. ज्या स्थानात वस्तू बद्ध असते, त्या स्थानात कलेचा अर्थ राहत नाही. मी असे म्हणतो आहे, कारण 'अर्थाच्या' अस्तित्वाचे स्वरूप हे continuum like आहे. स्थळ आणि काळ हे दोन्हीही वेगळेपण देणारे, वेगळेपण प्रस्थापित करणारे आहेत. भाषेसारख्या माध्यमातून कलेच्या अर्थाच्या किंवा कुठल्याही अर्थाच्या अस्तित्वस्वरूपाविषयी चर्चा कशी करायची, हा एक जटिल प्रश्न आहे. अर्थ हा सहज जाणला जातो. पण तो दुसऱ्याला सांगण्यासाठी शब्दांत पकडायचा प्रयत्न केला, की जे हाती लागते, ते विधानाच्या तिरडीवर ठेवलेले अर्थाचे कलेवर असते.

**टिपा.**

१. आस्वादकाचा सहभाग म्हणजे आस्वादकाच्या जाणिवेचा सहभाग. आस्वादक ही, सर्वप्रथम एक व्यक्ती आहे. व्यक्ती म्हणजे स्थळात बद्ध झालेली जाणीव.










बद्धतेमुळे जाणिवेला जडत्व प्राप्त होते. आणि कलाकृतीच्या घटकांचे संघटन ज्या आकाशात घडते त्या आकाशाचा आकार, हे जडत्व बदलत असते.

२. घटकांची ओळख (identiy) ही संघटनेत त्यांच्या असलेल्या स्थानावरून ठरत असते. संघटनेत बदल झाला, की घटकांच्या ओळखीत बदल संभवतो. या वाक्यातील 'निश्चित होते' या शब्दांवरून असा समज होण्याची शक्यता आहे, की घटकाची एकदा निर्माण झालेली ओळख (identiy) ही सदासर्वकाळासाठी तशीच टिकून रहाते, संघटनेत बदल झाला तरी ओळखीत (identiy मध्ये) बदल होत नाही. पण हे बरोबर नाही. एकाच कलाकृतीच्या लागलेल्या वा लावलेल्या दोन अर्थांचा तुलनात्मक विचार करताना, ही लक्षात घेण्याची बाब आहे. अर्थनिर्मितीच्या प्रक्रियेकडे यांत्रिक पद्धतीने पाहून चालणार नाही. प्रथम जणूकाही 'अर्थ' नसलेले घटक निर्माण होतात, नंतर ते कलाकृतीत एकत्र येतात. अशा प्रकारे त्यांच्या एकत्र येण्यातून कलाकृतीची 'निर्मिती' झाली, की नंतर कलाकृतीच्या अर्थनिर्मितीची प्रक्रिया जाणिवेच्या पातळीवर सुरू होते वा सुरू करायची. हे असे नसते. 'घटक' जन्माला येतो तेव्हा तो अस्तित्वात असलेल्या एका संघटनेचा एक 'घटक' म्हणूनच जन्माला येतो. पुढे हा 'घटक' अधिक मोठ्या संघटनेचा भाग झाला, तर 'अर्थाचा' विकास झाला असे आपण म्हणू शकतो, नाहीतर ऱ्हास. 'अर्थशून्य घटक' अशी काही गोष्ट नसते.

तसेच इथे सूक्ष्मतेने लक्षात घेण्याची एक बाब आहे. ती म्हणजे, 'अर्थ' कधी विकसित होत नाही वा त्याचा ऱ्हासही होत नाही. एक 'अर्थ' नष्ट होतो व दुसरा निर्माण होतो व ही निर्मिती जाणिवेच्या पातळीवर होत असते. विकास वा ऱ्हास हा, आठवणीत राहू शकणाऱ्या माहितीस्वरूपी अर्थात होत असतो आणि हा काही कलाकृतीचा खरा अर्थ नव्हे.

३) कलाकृतीतील घटकांच्या पातळीवर कलाकृतीची निर्मिती केल्यानंतर, या कलाकृतीचा निर्माता – म्हणजे लेखक, कवी, चित्रकार, शिल्पकार, वगैरे– हा पण कलाकृतीचा एक आस्वादकच असतो. हा आस्वादक व कलाकृतीच्या निर्मात्यापासून देहाने वेगळा असलेला आस्वादक, या दोघांच्यात आस्वादक म्हणून काही फरक नसतो. कलाकृतीचा निर्माता, कलाकृतीच्या निर्मितीनंतर जेव्हा स्वतःच्या कलाकृतीचा आस्वाद घेतो, तेव्हा त्याने लावलेला स्वतःच्या कलाकृतीचा अर्थ हा, कलाकृतीच्या निर्मात्याने लावलेला अर्थ आहे म्हणून जास्त बरोबर वा कमी चूक, असा काही नसतो. एखाद्या व्यक्तीला कलाकृतीचा निर्माता म्हणून जी पत असते, ती पत ही व्यक्ती आस्वादकाच्या भूमिकेत गेली, की तिथे आयात करता येत नाही. त्याला आपल्या आस्वादकाच्या भूमिकेचे समर्थन, आस्वादकाच्या पातळीवरूनच करावे लागते. कलाकृतीच्या संहितेच्या निर्मितीची प्रक्रिया व कलाकृतीच्या अर्थनिर्मितीची प्रक्रिया, या दोन्ही प्रक्रिया वेगळ्या आहेत, हे कधीच विसरून चालणार नाही.

अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# पञ्चवार्तिक - पंडित भीष्माचार्य

## (मराठीतील आद्य व्याकरणग्रंथ, १३ वे शतक)

डॉ. जयश्री पाटणकर

पञ्चवार्तिक या व्याकरण ग्रंथाचे पुनर्मुद्रण मो. स. मोने यांच्या, 'व्याकरणकार व व्याकरण प्रबंधकार' (१९२७) (पृ. ८९ ते ११८) ग्रंथात पाहावयास मिळाले.[१] मराठी अभ्यासकांना याचा थोडक्यात परिचय करून देण्याच्या हेतूने येथे मांडणी केली आहे.

पं. भीष्माचार्यांच्याही पूर्वी महानुभवीय ग्रंथकारांत भास्कर कवीश्वर व्यास (भास्करभट बोरीकर) यांचा "सुभाष्य" किंवा "भाष्य"[२] व आनेराज व्यास (गोपाळ पंडित/अनंत पंडित) यांचा 'लक्षणरत्नाकर' हे व्याकरण-ग्रंथ (निबंध) होते.[३] पण ते प्रत्यक्षात पाहण्यास मिळत नाहीत. महंत गोपीराज (जन्म जेहलम, पंजाब–समदाय दीक्षा इ. स. १८९२-१९२४ मध्ये यवतमाळ) व दत्तराज माहुलकर (इ. स. १८६७) यांच्या सहकार्याने 'पञ्चवार्तिक' च्या नकला मोने यांना मिळाल्या व त्या त्यांनी वरील ग्रंथात पुनर्मुद्रित केल्या आहेत.

प्रस्तुत ग्रंथाचे कर्ते पंडित भीष्माचार्य (१२ वे शतक) हे सारस्वत ब्राह्मण कुळातील असून काशी (ऋद्धिपूर) हीच त्यांची जन्मभूमी होती. महानुभव पंडित बोपदेव यांच्याजवळ त्यांनी विद्याध्ययन केले. काही दिवसांनंतर त्यांनी महात्मपंथाचे अनुसरण करून संन्यास घेतला. "गद्यराज स्तोत्र" "मार्ग प्रभाकर" "निरुक्त" "मुक्तमाला" "अवतारमाला" "नाममाला" "सुभाषितांताक्षरी टीका" "लक्षणरत्नाकर टीका" "गीतगोविन्द टीका, "संकेतभाष्य", आदी मराठी ग्रंथ, आणि "सिद्धान्त पताका", "दिनकर प्रबंध", "पदार्थ दीपिका" आदि संस्कृत ग्रंथ त्यांनी लिहिले आहेत.

*

प्रस्तुत ग्रंथाचे (= ३०३ पृष्ठे पुस्तिका) ५ भाग आहेत. १) सूत्रलक्षण, २) सूत्र प्रकृतिलक्षण, ३) सूत्रकारक लक्षण, ४) सूत्र व्याख्यान लक्षण, ५) सूत्र स्वरूप लक्षण. ग्रंथाच्या प्रास्ताविक प्रतिज्ञापर श्लोकात हे पाच भाग पाठ करणारा पंडित होईल, असे म्हटले आहे. ही ग्रंथरचना करण्याचे कारण महात्मजनांस ब्रह्मविद्या तत्त्वाचे यथार्थतः ज्ञान होत राहावे आणि शिक्षण परिपाठी योग्य रीतीने चालत राहावी[४] हे आहे. म्हणूनच विवेचनात जागोजाग दिलेली उदाहरणे ही ब्रह्मविद्यांतर्गत सूत्रेच आहेत. याचा अर्थ नियम सांगणे हा उद्देश तसा दुय्यम ठरतो. प्राचीन, मध्ययुगीन काळातील निरनिराळ्या शास्त्रांचा विकास हा धर्मशास्त्राच्या अंतर्गतच कसा होत होता, ते यावरूनही सिद्ध होते. पुढे १६४० मध्ये फादर स्टिफन्सने लिहिलेले 'मराठी बोलीचे व्याकरण'ही असेच धर्मप्रसारार्थच होते.[५]

पंडित भीष्माचार्यांनी प्रस्तुत ग्रंथात (पुस्तिकेत) मराठी भाषेचे समग्र व्याकरण दिलेले नाही. 'अर्थपूर्ण विधान म्हणजेच वाक्य' हे सूत्र केंद्रवर्ती ठेवूनच विवेचन केले आहे. शब्द म्हणजेच पद. या पदांचेच वाक्य बनते. पण पंडितांनी त्यास 'वचन' म्हटले आहे. येथे वचन याचा अर्थ भाषण, प्रतिज्ञा, बोलणे असे नसून 'आधारभूत वाक्य' असाच (शब्दकोशात दिलेला एक अर्थ) घ्यावयाचा आहे. सूत्राचे ते ("अल्पाक्षरे असंदिग्धे, सारवंते विश्वतोमुखें सार्थकें निर्दोषे जे ही प्रयोगे अर्थज्ञानु सूत्रिजे (मुद्रुजे) ते आ प्रयोगाने सूत्र ऐसे भणिजे"[६]) चार प्रकार सांगतात. १) वचन, २) वाक्य, ३) प्रकरण, ४) महावाक्य. या प्रत्येकाची व्याख्या याप्रमाणे–

"एकें दो शब्दे आचारा विचाराचा निर्वच की जे ते वचन बालिले : दो चौ वचनांचा समुच्चयो ते वाक्य बोलिजे : सांता पांचां वाक्यांचा मेळावा ते प्रकरण बोलिजे : सांता पांचा प्रकरणांचा बांधा ते महावाक्य बोलिजे"[७]

येथे 'वचन' याचा अर्थ "आचारविचारदर्शक (महानुभवांचा) एक वा दोन शब्द" पंडित महानुभाव संप्रदायी असून ते या संप्रदायाचे तत्त्वज्ञान या उदाहरणातून सांगतात. ही उदाहरणे नागदेवांच्या सूत्रपाठातील असतील. सूत्रपाठाचा अन्वयार्थ स्पष्ट करण्यासाठी येथे सूत्रांचे विश्लेषण, त्यामधील नियम शोधून काढण्याचा प्रयत्न

दिसतो.

या वचनांचेही ते १) एक पदांचे वचन, २) दोनी पदांचे वचन, ३) तीनि पदांचे वचन असे तीन प्रकार सांगतात. त्यांच्या दोन पदांच्या वचनाला, उदा. 'आनंद तो', 'ब्रह्म तो' (द्विपदीवचन); उदा. 'आनंद शब्दे' 'ईश्वरू बोलिजे' या त्रिपदांच्या प्रकाराला 'वाक्यांश' म्हणता येईल. याचा अर्थ पंडितांना वाक्यातील सगळ्यात लहान घटक म्हणजे पद हे समजलेले होते व पदांची रचना म्हणजे वाक्य हेही जाणवलेले होते. पण ते पद व शब्द यांत भेद करीत नाहीत.

पुढे पृष्ठ ९६ ते ९८ मध्ये 'वाक्य विचार' मांडला आहे. येथे वाक्याचे पदांच्या संख्येवरून (४ते १८पदे) पंधरा प्रकार मानले आहेत. सुरुवातीच्या व्याकरणकारांना (पंडित भीष्माचार्य तर आद्य व्याकरणकार) लहान वाक्य (चौ पदांचे वाक्य) (कमी पदे). मोठे वाक्य (अठरा पदांचे वाक्य) (जास्त पदे) हेच वाक्याचे ढोबळ प्रकार जाणवलेले दिसतात.

पुढे मात्र त्यांनी केवळ संयुक्त रचनेवरून दोन प्रकार मानले व त्यांची उदाहरणे दिली आहेत. (जेथ एकचि क्रियापद समग्रा पदाते व्यापी ते केवळ वाक्य) 'ज्या वाक्यात एकापेक्षा जास्त क्रियापदे ते संयुक्त वाक्य होय.' पुढे त्यांनी 'वचन' व 'प्रयोग' व 'वाक्य' व 'प्रयोग' असे मिळून होणारी, 'वचनवत्प्रयोगां' व 'वाक्यवत्प्रयोगां', व 'वचनवाक्यवत्प्रयोगां' असे तीन प्रकार (संयुक्त वाक्यांचे, सांगितले आहेत. (आज आपण त्याला संमिश्र प्रयोग असे म्हणू शकू.)

'वचनवत् प्रयोगा' उदा. "चैतन्य देवता होए परि परमेश्वरू नव्हे". एथ 'चैतन्य देवता होय' हा एक प्रयोग व 'परि परमेश्वर नव्हे' हा दुसरा प्रयोग (प्रयोग म्हणजे बोलणे, वाक्य या अर्थी). येथे दोन्ही प्रयोगांत तीन तीन पदे असल्याने (तीन पदांचे वाक्य ते वचन) हे त्रिपदी वचनवत प्रयोगाचे उदाहरण होय. (तीन पदे असणे म्हणजे 'वचन' हे गृहीत आहे.)

'वाक्यावत् प्रयोगा' –उदा. "हा गा देव कांई अनेक असति देव तो एकचि की" येथे 'हा गा देव कांई अनेक असति' हा एक प्रयोग व 'देव तो एकचि की' हा दुसरा प्रयोग. येथे दोन्ही प्रयोगांत अनुक्रमे 'षट्पदे' व 'पंचपदे' असल्याने ते वाक्यवत् प्रयोगाचे उदाहरण होय. ('वाक्य म्हणजे दो चौ वचनांचा समुच्चयो', पृ.८९) (वचन म्हणजे तीनि पदांचे सूत्र ते जे पुढे ते एक दोन शब्दांनाही आचार विचार दर्शन वचन) (उदा., कृपाळू, निरालंब इ.) म्हणतात.

येथे पंडितांनी वचन हे फक्त एक वा दोन ते तीन पदांचे असते, असे म्हटले होते. (पृ.८९)

वस्तुतः 'चैतन्य देवता होए' याला उपवाक्य म्हणावयास काहीच हरकत नाही. पहिल्या उदाहरणात 'परि' हे उभयान्वयी योजून वाक्य जोडले आहे. तर दुसऱ्या वाक्यवत् प्रयोगाच्या उदाहरणात 'देव तो' येथपासून दुसरे विधान सुरू होते. वस्तुतः 'असति' नंतर स्वल्पविराम (प्रत्यक्षात वाक्य उच्चारताना प्रत्येक माणूस तेथे किंचित विराम घेतोच). दर्शनी ते वाक्य उभयान्वयी वाक्य आहे, असे वाटले असते. ते तसेच आहे, फक्त उभयान्वय अध्याहृत आहे. वस्तुतः पहिल्या व दुसऱ्या उदाहरणात रचनादृष्ट्या काही फरक नाही. ती एकाच प्रकारची संमिश्र वाक्येच आहेत.

वचन वाक्यवत् प्रयोगाचे पहा. उदा. एथ श्रीकृष्णी 'त्रिविधजन' श्रीप्रभूच्या ठांई द्विविध जन" या वाक्यात पंडित म्हणतात, 'एक श्रीकृष्णी त्रिविधजन' हा प्रयोग व 'श्रीप्रभुच्या ठांई द्विविधजन' हा दुसरा प्रयोग. या दोन्ही प्रयोगांत अनुक्रमे त्रिपदी, चतुष्पदी रचना आहेत. म्हणून हे 'वचनवाक्यवत् प्रयोगाचे' (वाक्याचे) उदाहरण होय. तीन पदांच्या वाक्यास पंडित, 'वचन' म्हणतात व पुढे जसजशी पदे वाढतील त्याप्रमाणे (अठरा पदांचेही वाक्य असते. हा वाक्याचा एक प्रकार ते मानतात) वाक्यांचे प्रकार होतात, असे पंडित मानतात. वाक्यांचे प्रकार हे अगदी ढोबळ आहेत व त्यात नियम असा कोणताही नाही.

पंडितांचा हा वाक्यविचार वाक्यांचे १५ ढोबळ प्रकार (ढोबळ यासाठी की त्यात केवळ पदसंख्येनुसार वाक्याचा प्रकार पाडला आहे.) व केवळ व संयुक्त असे रचना दृष्ट्या (व्याकरणिक दृष्ट्या - व्याकरणातील वाक्यात क्रियापदाचा विचार प्राधान्याने असतो.) दोन प्रकार सांगून पूर्ण होतो. वाक्यातील अध्याहृत पदे वा अनुवृत्त (अर्थाच्या दृष्टीने आवश्यक तेव्हा) पदेही ओळखून 'वाक्य' लक्षात

घेतले पाहिजे, असेही ते सांगतात (पृ.९८).

अशा प्रकारे 'सूत्रलक्षण' या पहिल्या भागात, प्रथमतः त्यांनी 'वाक्य' विचाराला हात घातला आहे, हे विशेष.

अर्थात हा विचार सांप्रदायिक विचार व त्यासंबंधीचे विवेचन कसे केले जाते, त्याचे वर्गीकरण करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. म्हणूनच पुढे ते 'प्रकरण', 'महाकाव्य' म्हणजे काय ते सांगतात. वस्तुतः तर्कतः वाक्यानंतर 'महाकाव्य' न येता 'प्रकरण' ही (विवेचनाचे वर्णन करणारी) संज्ञा विश्लेषिली आहे. (येथे प्रकरण याचा आजचा अर्थ विभाग असा घ्यावयाचा नाही, तर परिच्छेद असा घ्यायचा) १) बारा वाक्यांचे सूत्र ते प्रकरण बोलिजे.

पंडितांच्या दृष्टीने 'प्रकरण' म्हणजे (पृ.८९) 'सांता पाचा वाक्यांचा मेळावा ते प्रकरण बोलिजे': अशी दोन सूत्रे एकाच पृष्ठावर आहेत. असे म्हणून पृ.९९-१०० वर प्रकरणांचे १२ प्रकार (तीन वाक्यांचे प्रकरण, चार ते बारा) सांगितले आहेत. पुढे त्यांनी जी प्रत्येक प्रकरण - प्रकारांची उदाहरणे दिली आहेत, ती पाहता प्रत्येक वाक्य स्वतंत्र व संपूर्ण असले पाहिजे असे नाही, तर एक मुख्य विचार व त्याचा विस्तार किंवा तपशील जेथे दिलेला असतो, अशी अनेक विधेये किंवा उद्देश (नामे) एकत्र करून जे मोठे वाक्य बनविलेले असते, त्यास पंडित प्रकरण असे म्हणतात. (यास आपण आज संयुक्त वाक्य म्हणतो.)

पांचा वाक्यांचे प्रकरण सूत्र. यथा (पृ.९९) "साकरी, शांभवी, शुद्धा, वेधवती, विष्णु, महादेव, शेषशायी या चौघांचि या च्यार्‍ही विद्या, साकरी ब्रह्मे आची, शांभवी महादेवाची, शुद्धा विष्णुची, वेधवती शेषशायीची". म्हणूनच प्रकरण याचा अर्थ एक विचार देणारा एक परिच्छेद व तो अनेक वाक्यांनी संयुक्तपणे एकत्र बांधलेला असतो, असा त्याचा अर्थ आहे.

'महाकाव्या' ची पंडित भीष्माचार्यांची कल्पना अशी – "सातापांचा प्रकरणांचा बांधा ते महाकाव्य"[८] पुढे ते म्हणतात – त्यांच्या महाकाव्याच्या कल्पनेत अनेक नामांचा (विचारवस्तु) विचार (परामर्श) केलेला असतो. उदाहरणादाखल त्यांनी "ज्ञान, ध्यान, मंत्र, स्थावर" अशा चार नामांचा उल्लेख केलेला आहे; पण 'महाकाव्य' कल्पितांना मोठा सृष्टी विचार, गहन विचार, आध्यात्मिक विचार हा अर्थ अभिप्रेत असावा. एखाद्या विशिष्ट विषयाच्या भोवती गुंफलेले, तदानुषंगिक अनेक विचार जेथे असतात ते महाकाव्य. 'महाकाव्य' ही संज्ञाही कदाचित महात्म पंथियांचा विचार / तत्त्वज्ञान या अर्थी असावी. व्याकरण सांप्रदायिक तत्त्वज्ञानाने झाकोळलेले आहे. वचन म्हणजे जे चक्रधरोक्त आचारविचार तर महापुरुषांचे तात्त्विक विचार ते 'महाकाव्य', असेच त्यांना अभिप्रेत आहे. 'क्रियापद, वाक्य, प्रयोग, संयुक्त वाक्य, केवळ वाक्य या व्याकरणिक संज्ञा ते वापरतात, तरी त्या पूर्णपणे आजच्या व्याकरणशास्त्रीय अर्थाला अनुसरून नाहीत. त्या धर्मशास्त्रालाच अनुसरून आहेत.

पुढे त्यांनी 'अवघे आ शास्त्राचा आवाका, (निरूपणाचा आवाका, प्रकरणाचा आवाका) यास 'पेंडी' बोलिजे, असे म्हणून आध्यात्मशास्त्रीय विवेचनाचा उहापोह जेथे असतो त्या विवेचनाला 'पेंडी' असे म्हटले आहे. खरे म्हणजे पंडितांना सूत्र म्हणजे काय (विश्ववाणीचा अर्थ) ते सांगावयाचे होते. सांगण्यासाठी मात्र ते पदांचे विश्लेषण करतात – म्हणजे अन्वयसारग्रहण असे करावयाचे, ते सांगतात. त्यासाठी त्यांना जे विश्लेषण, वर्गीकरण, विग्रह करावयाला संधी सोडवावी लागते त्या त्या त्यांनी केल्या. आज (१९५७ नंतर) चॉम्स्कीने 'वाक्य' हाच भाषाविज्ञानाचा केंद्रभूत विषय मानून स्वनविचार, रूपिमविचार व अर्थविचार केलेला आहे. तसेच पंडितांना सांप्रदायिक तत्त्वज्ञान प्रसारासाठी का होईना, वाक्य विचार, वचन (एकें दो शब्दे आचारा विचाराचा निर्वच पासून) महत्त्वाचा वाटला हे विशेष.

पुढे त्यांनी वाक्यातील 'पद' कसे तयार होते त्याचे विवेचन केले आहे (पृ. ९० ते ९५). पदाला लिंग, वचन व प्रत्यय (कृदन्त व तद्धित) लागतात. संधी व समासांची संयुक्त पदे कशी बनतात, त्याचे सोदाहरण विवेचन केले आहे. यातील सर्व विचार संस्कृत व्याकरणात (एकवचन, द्विवचन, बहुवचन, सात विभक्ती, धातु प्रत्यय (कृदन्त) नाम-प्रत्यय (तद्धित) अनुसरूनच आहे. उदाहरणे मात्र महानुभवीय संप्रदायाच्या तत्त्वज्ञानातील आहेत.

*

दुसरा विभाग सूत्र 'प्रकृतिलक्षण' असा आहे. पहिल्या








विभागात सूत्र म्हणजे 'विश्व वचनाचे संक्षिप्त अर्थज्ञान' हे आपण पाहिले. शिवाय ते एक-दोन पदांपासून 'पेंडी' पर्यंतही प्रगट होते. म्हणजे विवेचनाचे वर्गीकरण आपण पाहिले. आता या विभागात सूत्रात परस्परसाम्य (रचना दृष्ट्या) असले, तरी जो वेगळेपणा आढळतो तो का- त्याचा विचार म्हणजे सूत्र प्रकृति (स्वरूप) लक्षण विचार होय. ती दहा आहेत.

१) संज्ञा अ) विशेषनाम – उदा., परा, पशन्ती, मध्यमा, वैखरी.

ब) सामान्यनाम – उदा., लौकिक, भौतिक, उपसंहाराख्य, लाभाख्य.

२) परिभाषा* शब्द किंवा अर्थाचे ज्ञापकसूत्र. उदा. भणिजे, बोलिजे, बोलिजेति यालाच 'क्रियापद' असेही म्हणतात.

*लक्षणसूत्र हे शब्दार्थाचे ज्ञापक असते. उदा. 'नित्य बद्धा देवता', 'नित्यमुक्त परमेश्वरू' इ.

या उदाहरणावरून त्यांना येथे विशेषण-विशेष्य जोड्या सांगावयाच्या आहेत, असे दिसते.

*

संख्या ज्ञापक सूत्रे ही शब्दार्थाची ज्ञापक असतात. उदा., 'बत्तीस लक्ष' कृतयुग, कृतयुगी लक्षभर आयुष्य. येथे बत्तीस किंवा लक्ष – अशी संख्या सांगितली आहे. म्हणून त्याला ते 'संख्याज्ञापक सूत्र' म्हणजे संख्याविशेषण असे म्हणतात.

या तीनही प्रकारच्या शब्दांना ते 'परिभाषा' असे म्हणतात. दिलेल्या उदाहरणावरून सांप्रदायिक विचार ज्या परिभाषेत (परिभाषा–विशिष्ट क्षेत्रात विशिष्ट अर्थाने वापरला जाणारा शब्द) व्यक्त होत होता, त्याचे त्यांनी क्रियापद, लक्षणसूत्र, संख्याज्ञापक सूत्र अशा परिभाषेत वर्णन केले आहे. ही परिभाषा संस्कृत व्याकरणाचीच आहे.

३) विधिसूत्र :- विधिरूप किंवा निषेधरूप क्रियापदे- -उदा., कीजे, करावा, न करावा, न होआवी इ. या उदाहरणांवरून ही आज्ञार्थाची क्रियापदे दिसतात. आज आपण क्रियापदावरून कोणता अर्थ व्यक्त होतो. (आज्ञार्थ, विध्यर्थ, संकेतार्थ इ.) ते पाहतोच.

४) नियम सूत्र – 'वस्तू' वर्णन करणारी क्रियापदे – उदा., करवी, बोले, दोनि, द्यावी, असे उजळे, अवतरे इत्यादी.

येथे वस्तू याचा अर्थ 'विषयवस्तु' (विश्वज्ञान ज्या ज्यामुळे होते ते ते) या नियमांचे चार प्रकार १) वस्तुनियम, २) वस्तुस्वरूप नियम, ३) वस्तुकारण नियम, ४) वस्तुकार्य नियम.

वस्तुनियम – म्हणजे सार्वत्रिक सत्य.

वस्तुस्वरूप नियम – म्हणजे वस्तूच्या स्वरूपा-विषयीचे विधान.

वस्तुकारण नियम – म्हणजे सत्यामागील कारण सांगणारे विधान.

वस्तुकार्य नियम – म्हणजे कार्यफलरूप विधान.

या ठिकाणी दिलेली सर्व उदाहरणे चक्रधरोक्त महानुभवीय तत्त्वज्ञानाची आहेत, पण पंडित असे प्रकार-उपप्रकार सांगून वाक्याचे अर्थावरून प्रकार सांगत आहेत, असे दिसते. वरही आपण आज्ञार्थी क्रियापदे (विधाने) पाहिलीत.

५) अतिदेश – दृष्टान्त सूत्र. वाक्यात जेव्हा दृष्टान्त (तोही अध्यात्म ज्ञानाचा सांगितलेला असतो, अशा वाक्याला अतिदेश सूत्र म्हणावयाचे)

६) अपवाद सूत्र – वाक्यात जेव्हा निंदा–स्तुती यांची तुलना (व्यक्तिरेकाने) केलेली असते, असे विशेषतः पंचमी विभक्तीचा वापर करून केलेले विधान (उदा. ज्ञानापसि प्रेम उत्तम).

७) विभाषा – ज्या वाक्याचा शेवट संबोधन, द्वितीया, तृतीया, चतुर्थी, पंचमी, षष्ठी, सप्तमी किंवा अव्ययाने केलेला असतो, असे विधान. थोडक्यात 'विभक्त्यन्त वाक्य'. उदा., जीवेश्वरा स्वामिभृत्य संबंध हा अनादिचा (षष्ठी विभक्ती)

८) निपात – ज्या वाक्यात पद किंवा वाक्य अनुपस्थित असते, असे वाक्य (ज्या वाक्यात कार्यकारण भाव असूनही तो दिसत नाही). उदा., 'कृतयुगी आत्मोपस्ति हा धर्म' – एथ धर्म हे कर्तृपद असे परि 'असे' या क्रियापदाचा अभाव जानिजे.

९) प्रतिषेध सूत्र – ज्या वाक्यात आचार सूत्रा-व्यतिरिक्त, नव्हे, नाही, नेविजे, न पविजे अशी निषेधात्मक क्रियापदे असतात, असे वाक्य.










१०) अधिकार सूत्र – अधिकृत पद (अधिकार, सामर्थ्य ज्याच्या ठिकाणी आहे) ज्या वाक्यात असते असे वाक्य. उदा, "नित्य व्यापक परमेश्वरू."

अशा प्रकारे या दहा संज्ञा वापरून ते विधानांचे वर्गीकरण करतात. क्रमांक ३ ते १० ही सूत्रे विधानांचे अर्थदृष्ट्या वर्ग करतात, तर पहिली दोन संज्ञा परिभाषा ही विधानात संज्ञा (जीव जगत ज्ञान) आहे, का संख्या (संख्या तीही पारमार्थिक क्षेत्रातील विशेषत:), यावरून ठरतात. पण विभागाच्या शेवटी जी गोळाबेरीज दिली आहे, तेथे वाक्यात क्रियापदे कोठे आहेत, कशी आहेत (विधी-निषेध-दृष्टान्तरूप इ.), कोणत्या विभक्तीत आहेत त्यावरून ती सूत्रे (सूत्रवाक्ये) ओळखावी, असे म्हणतात. येथे पंडितांना क्रियापदांनाही विकार होतात, विभक्ती म्हणजे कोणते ना कोणते प्रत्यय लागतात, हे जाणवलेले दिसते. आजच्या दृष्टीने या विवेचनाचा व्याकरणिक उपयोग एवढाच आहे. पंडितांनी वैय्याकरणाचा दाखला देऊन "संज्ञा व परिभाषा च विधिर्नियम एव च.....तद्दशधा विदु :" (पृ. १०२). या परिभाषेचा वापर करून आपले सांप्रदायिक तत्त्वज्ञान त्यात बसविले, असे दिसते.

तात्पर्य, हा 'वाक्यविचारच' होता. अर्थदृष्ट्या वर्गीकरणाचा हा प्रयत्न होता. 'क्रियापदाचा अर्थ' हा महत्त्वाचा असतो, हे येथे जाणवलेले होते.

*

तिसरा विभाग 'सूत्रकारक लक्षणा'चा. येथे कारक म्हणजे अर्थद्योतक, अर्थनिर्णायक प्रत्यय, विभक्तप्रत्यय. मराठी व्याकरणात विभक्ती ही संकल्पना बरीच वादग्रस्त आहे. पंडितांनी नागदेवांच्या वचनांचा आदर करून विभक्तिविचार अवश्य केला आहे. त्यायोगे/ पर्यायाने सूत्राचा अर्थ नीट समजण्यास मदत होईल.

विभक्ती - ७

प्रथमा – कारक – कर्ता-उदा., "माया जीवांते विकरे."

प्रत्यय – प्रत्यय नसौनि केवळ तत्तच्छब्द मात्राचे प्रयोगी प्रथमा असे. उदा., जीव, देवता, परमेश्वरू, एवमादि.

कर्मणि प्रयोगात कर्म प्रथमेत असते. उदा., परमेश्वरे, परमेश्वर पाविजे.

वाक्यातील संबोधनाची प्रथमा विभक्ती असते. उदा., देमति!

द्वितीया-कारक-कर्म-उदा., मग जीव प्रपंचाते रचीति।

प्रत्यय – ते, सि, आ. इथे प्रत्यये जे आ शब्दाचे आ अंती असति ते आ शब्दाची द्वितीया जाणावी. उदा., अयोग्यासी योग्य करिती.

तृतीया – कारक – साधन व कर्ता – उदा., आत्मज्ञाने मोक्ष।

प्रत्यय – एं, करौनि, नि. इथे प्रत्येये जे आ शब्दाचे अंती असति त आ शब्दाची तृतीया विभक्ति जाणावी. उदा., 'अज्ञान छेदे करौनि अन्यथा ज्ञानु त्रुटि होए।'

चतुर्थी – कारक – संप्रदाय – उदा., ज्ञानियासि मोक्ष देती।

प्रत्यय – सि, कारणे, लागी. आं इथे प्रत्यय जे आ शब्दाचे आ अंती असति ते आ शब्दाचि चतुर्थी विभक्ति जाणावी. उदा. ईश्वराची आज्ञा ते ईश्वराचे कारणे भंगैली की.

पंचमी – कारक – अपादान – उदा., ईश्वरापासौनि विद्या होए का विद्यावंतापासौनि.

प्रत्यय पासौनि, पासाव, स्तव, पसि, कडौनि हौनि, एवमतिद प्रत्यये जे आ. उदा. चंद्रसूर्या पासौनि आतव.

षष्ठी – कारक – संबंध. उदा., कवाडांचा देऊळी न बैसावे.

प्रत्यय-चा, ची, चे, सि. इये प्रत्यये जे आ शब्दाचे आ अंती असति. उदा. ईश्वरीचे ते सकलही नित्य.

सप्तमी – कारक – अधिकरण – उदा., ईश्वरी संपूर्णा शक्ति जीवी अंशतः शक्ति.

प्रत्यय – ई हा प्रत्यय जे आ शब्दाचे आ अंती असति ते आ शब्दची सप्तमि विभक्ति जाणावी. उदा., दयामाया कृपा करुणा हे ईश्वरींचि आति।

तसेच प्रत्येक विभक्ति प्रत्ययाच्या लेपाचीही उदाहरणे दिली आहेत. येथे संबोधनविभक्ति मानलेली नाही. फक्त संबोधन वापरले असता तेथे प्रथमाच असते, असे सांगणारे उदाहरण दिले आहे. पंडित भीष्माचार्यांनी १३ व्या शतकात महानुभव पंथीयांच्या वापरात, लेखनात असलेल्या वाक्यांत आढळलेल्या विकारी शब्दांचा विचार संस्कृत

व्याकरणाप्रमाणे केला. पण त्या काळात, मराठी भाषेत वापरल्या जाणाऱ्या प्रत्ययांचा विचार मांडला. तसेच विभक्तीत जसे प्रत्यय असतात, तसा अर्थही असतो. वाक्याच्या उपयोजनात, अर्थनिर्णयात या अर्थाचा म्हणजे कारकाचा विचार केला पाहिजे, असे त्यांना जाणवलेले दिसते.

वर दिलेले प्रत्यय पाहता ते जसे एकाक्षरी आहेत, तसे काही शब्दयोगीही त्या त्या विभक्तीत वापरले जातात, हेही सांगितले आहे. उदा., कारणे, लागी, पासौनि, कडौनि, स्तव, पसि इ. इ. आजही तीच स्थिती आहे. व विभक्ती किती, कोणत्या प्रत्ययाच्या कारकार्थ विचारात घ्यायचा असा प्रश्न उपस्थित न करता अर्थनिर्णयात विभक्तीचे प्रयोजन काय, ते ते स्पष्ट करतात.

*

चौथा विभाग 'सूत्र व्याख्यान लक्षणा'चा या विभागात व्याख्यानातील (म्हणजे विवेचनातील वाक्याचा अर्थ लक्षात घेऊन सहा प्रकारच्या वाक्यरचनाप्रकारांचा विचार केला आहे.)

१) पदच्छेद – ज्या वाक्यात केवल, संयुक्त, अव्यय व क्रिया या चार व्याकरणिक संकल्पनांचा वापर केलेला असतो, अशा वाक्यप्रकारास पदच्छेद म्हणावे. उदा. 'मग जीव प्रपंचाने रचीति' एथ 'मग' हे अव्ययपद, 'जीव' हे प्रथमात केवलपद, प्रपंचाने हे द्वितीयान्त संयुक्तपद (प्रपंच + आ + ते), 'रचीति' हे क्रियापद आहे.

२) पदार्थोक्ति - जेथे प्रत्येक पद अर्थपूर्ण (आध्यात्मिक तत्त्वज्ञानाच्या दृष्टिकोनातून, 'पदार्थमाना'चा तात्त्विक विचार) असते असे विधानकच. उदा., 'माया कार्य जीवु जीवकार्य प्रपंचू एथ मायेने कार्य सकळजीव आत जीवांचे कार्य त्रिगुणात्मक पंचभौतिक प्रपंच हे पदार्थोक्ति जाणिजे.'

३) ज्या वाक्यात शब्दार्थ विग्रह करून सांगितलेला असतो असे वाक्य. उदा., "वसुदेवाचा पुत्र तो वासुदेव" एवमादि अर्थाचिये अवबोधके जिये वाक्य ते आंते विग्रह भणिजे.

४) वाक्ययोजना– दोन प्रकार १) खंडान्वयो, २) दंडान्वयो.

१) खंडान्वयो या वाक्यात कर्ता, कर्म, क्रिया, क्रियाविशेषण आणि करणादी उपपदे आणि यथोचित स्थानी अव्यय असते, अशा प्रकाराला खंडान्वये वाक्य असे म्हणावे. उदा., 'ऐसिया मायापूराते स्वीकारौनि कर्मभूमिस्थितां मनुष्य देहयुक्तां जीवां ज्ञान पर्यंत आपुला संबंधु देति'. या वाक्यात परमेश्वर हा कर्ता आहे, पण तो अध्याहृत आहे. 'कर्मभुमि - स्थिता मनुष्यदेहयुक्तां जीवा' - येथे जीवा हे कर्मपद व तत्पूर्वीची ती त्याची विशेषणे. 'संबंधु देति' क्रिया कसा? तर 'ऐसिया मायापुराते स्वीकरौनि' असा.

या प्रकारच्या वाक्यरचनेला आपण आज साधे वाक्य, केवल वाक्य, कर्मणि प्रयोगातील वाक्यरचना असे म्हणतो.

२) दंडान्वयो वाक्य – यातील सर्व पदे – कर्ता, कर्म, क्रिया ही विशेषणयुक्त असतात. उदा. 'एथिचे आसि प्राणापदीची पीडा नाही'. एक 'प्राणापदीची पीडा (विशेषण-विशेष्य जोडी) एथचि आसी नाही' ऐसा अन्वयो लाविजे.

हा वाक्यरचनेचा काही विशेष प्रकार नसून प्रत्येक पदाला विशेषण लावलेले असते ते समजून घेऊन त्याचा अन्वय लावून अर्थग्रहण करावे.

५) आक्षेप– ज्या वाक्यात एखाद्या पदाविषयी आक्षेप किंवा शंका वाटते, अशी रचना ते 'आक्षेप' वाक्य. उदा., "यापरि परमेश्वरू श्री चक्रधर सकळ जीवांते उद्धरिती" इथे सूत्री 'परमेश्वरू' हे पद असता पुनः 'श्रीचक्रधर' या पदाचे प्रयोजन काई? हा आक्षेप असे.

६) समाधान – ज्या वाक्यात एखाद्या पदाचे प्रयोजन स्पष्टपणे जाणवते (म्हणजे तेथे ते पद असणे आवश्यक वाटते, अशी रचना) असे वाक्य "समाधान" या प्रकाराचे असते. उदा., "यापरि परमेश्वरू श्रीचक्रधर सकळ जीवांते उद्धरिती" या वाक्यात परमेश्वरू हा शब्द असूनही श्रीचक्रधर हा शब्द येतो व तो (सांप्रदायिकांच्या, प्रचारकांच्या दृष्टीने) अर्थपूर्ण नव्हे आवश्यक वाटतो, म्हणून ते 'समाधान' प्रकारचे वाक्य होय.

या प्रकारच्या वाक्यरचनेत फक्त पहिल्या प्रकारची वाक्यरचना म्हणजे 'पदच्छेद' ही व्याकरणिक संज्ञांचा अर्थ घेऊन केलेली रचना आहे व चौथा प्रकार जो वाक्ययोजना यात कर्ता, कर्म आदी व्याकरणिक संज्ञांचा वापर व त्यालाच जेव्हा विशेषणे लावलेली असतात असे विशेषणयुक्त वाक्य, असे म्हटले आहे. परंतु 'पदार्थोक्ति, विग्रह, आक्षेप, समाधान' हे वाक्यप्रकार 'सांप्रदायिक अर्थावर' आधारलेले आहेत. पुढे एकाच

वाक्याची सहाही प्रकारची रचना कशी होऊ शकते, ते सोदाहरण स्पष्ट केले आहे. थोडक्यात, अन्वय कसा लावाला व तसा तो लावल्यास अर्थबोध कसा होतो, हेच त्यांना सांगावयाचे आहे. थोडक्यात, वाक्य-पृथक्करणाचीच ही प्रारंभिक स्थिती दिसते.

*

सूत्र स्वरूप लक्षण या पाचव्या भागात सूत्राची (वाक्याची) ३२ लक्षणे सोदाहरण स्पष्ट केली आहेत.

१) प्रतिज्ञा – फलश्रुती सांगणारे वाक्य.

२) प्रमाण – दृष्ट–अदृष्ट अर्थाचा अनुभव देणारे वाक्य.

३) दृष्टान्त – दृष्टान्त देऊन अदृष्ट अर्थ सुचविणारे वाक्य.

४) उपपत्ति – संतवचन.

५) व्यावृत्ति – यथार्थ ज्ञान देण्यासाठी सामान्य पदार्थाच्या विवेचनातून विशेष बुद्धीचा तिरस्कार केलेला असतो असे वाक्य (व्यतिरेकाने ज्ञान).

६) विषयप्रदान – सारस्वरूपाचे विधान.

७) विशेष प्रबोधक – काय करावे व काय करू नये, यासंबंधी ज्ञान सांगणारे विधान.

८) उत्सर्ग – एका सूत्राचा अर्थ दुसऱ्या सूत्राच्या साहाय्याने किंवा संदर्भात विचारात घ्यावयाचा असतो, असे विधान.

९) अपवाद – एखाद्या विधानात उत्सर्गाची निंदा करून निषेध केलेला असतो, असे 'अपवाद' सांगणारे विधान.

१०) निषेध – कोणत्याही काळी जे कृत्य निषेधनीय, असे विधान.

११) न्याय – अनुक्तार्थ सांगणारे विधान.

१२) विरोध परिहार – एखाद्या वेळी जे करणीय ते दुसऱ्या वेळी अकरणीय असते, जे एखाद्या वेळी अकरणीय म्हणून सांगितलेले असते ते एखाद्या वेळी 'करणीय' म्हणून मानले जाते – असे विधान.

१३) काकु – शब्दाच्या विशेष उच्चारणातून अर्थद्योतन केले जाते.

१४) कक्षा– बाह्यतः सामान्य शब्द, पण अंतरी गूढ हेतू

१५) भावार्थ – सामान्यपणे दृग्गोचर होणारी अर्थरचना.

१६) प्रकरण – अनेकार्थी शब्द पण विशेष प्रसंगी त्याचा एकार्थच वापरलेला असतो.

१७) अस्तित्व – 'आति' सारखी क्रियापदे वापरून अस्तित्व' हा अर्थ स्पष्ट केलेला असतो, अशी वाक्ये.

१८) निर्देश – पदार्थमात्रातील भेद यथोचितपणे स्पष्ट केलेला असतो.

१९) निर्णयो – हीन शब्दातून उच्चार्थ व्यक्त केलेला असतो.

२०) पक्ष – ज्या वाक्यातील पदांचे अनेकार्थ असतात, असे वाक्य.

२१) प्रभेद – जो ज्याचा अभेद, तो दुसऱ्याचा भेद दर्शविणारे वाक्य.

२२) आशंका – दर्शनी विरोधी कल्पना एकत्र असणारे वाक्य.

२३) आक्षेप – प्रश्नांकित वाक्य.

२४) कार्य – कार्य दर्शविणारे वाक्य.

२५) लक्षण – पदार्थाचे असाधारणत्व (वैलक्षण्य/लक्षण/वेगळेपण) सांगणारे वाक्य.

२६) स्वरूप – स्व-रूपाचे (ईश्वर, ब्रह्म इ.) वर्णन करणारे वाक्य.

२७) कारण – कारण देणारे विधान.

२८) हेतु – प्रत्येक विधिनिषेधामागील हेतू सांगितलेला असतो.

२९) संबंध – यातील वाक्याचा संबंध पूर्वोत्तर वाक्याशी जोडून उपसंहार केलेला असतो.

३०) प्रतीति – यथार्थ ज्ञान सांगणारे निश्चयात्मक विधान.

३१) विशेषण – एखाद्या विशेषणातून अन्य विशेष्य निर्देशित केलेला असतो.

३२) प्रतिष्ठा – ज्या वाक्यातून शास्त्राचा उत्कर्ष प्रतिष्ठित केलेला असतो

अशा प्रकारे वाक्यार्थ सांगणारी ३२ प्रकारची वाक्ये/लक्षणे येथे पंडितजींनी सांगितली आहेत. ही लक्षणे एक प्रकारे विशिष्ट अलंकारांचा निर्देश करतात असे दिसते. वाक्यांचे येथे व्याकरणिक प्रकार न सांगता साहित्यशास्त्रीय प्रकार सांगितले आहेत असे दिसते.

थोडक्यात, पंडित भीष्माचार्यांचे 'पञ्चवार्षिक' हा






निव्वळ व्याकरणग्रंथ नाही. सूत्रलक्षणात (भाग-१) वाक्य कसे बनते, पदांची घटना कशी होते, विकारांगे कोणती (वचन, विभक्ती, कृदन्त, तद्धित प्रत्यय) हे त्यांनी सांगितले आहे. व वाक्य-प्रकरण-महाकाव्य-पेंडी-अशी चढत्या पदसंख्येवरून, वाक्यसंख्येवरून व प्रकरणसंख्येवरून उत्तरोत्तर मोठ्या वाक्यसमूहाचा विचार मांडला आहे. येथे विवेचनाचा हेतू सांप्रदायिक तत्त्वज्ञान, आचारधर्म कथन हाच आहे. 'सूत्र प्रकृति' लक्षणात दहा व्याकरणिक संज्ञा (संज्ञा ते अधिकार), सामान्यनाम (संज्ञा), विशेषनाम, क्रियापद, परिभाषा, विशेषण, संख्याविशेषण, आज्ञार्थ, विधिनिषेध, वाचक क्रियापदे विभक्त्यन्त वाक्ये यांच्या व्याख्यार्थाबरोबर दृष्टान्त, निपात, प्रतिषेध, अधिकार–या वाक्यार्थ सांगणाऱ्या विधानांचे स्पष्टीकरण केले आहे. यामुळे ते दहा 'सूत्र प्रकृतीं'चे (व्याकरणिक संज्ञांचे) वर्णन करीत नसून विवेचनातील आशय लक्षात घेऊन परिभाषेचा वापर करतात. तेव्हा हा निव्वळ व्याकरण लिहिण्याचा हेतू नसून अन्वयार्थ लावणारे साहित्यशास्त्रीय मन दिसून येते. तीच गोष्ट सूत्राची ३२ लक्षणे सांगताना दिसते. चौथ्या भागातील वाक्यपृथक्करणाचा (६ प्रकारची वाक्यरचना) विचारही अन्वयार्थ लावण्याच्या प्रयत्नातूनच आला आहे. तीच गोष्ट सूत्रकारक लक्षणाची (भाग-३-विभक्तिविचार) यामुळेच पंडित भीष्माचार्यांचा व्याकरण रचण्याचा फार मोठा आवाका होता, असे नसून हा पहिलाच प्रयत्न होता; म्हणून त्याची विशेष दखल घेतली पाहिजे.

**संदर्भसूची.**

१) मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण प्रबन्धकार/ मोरेश्वर सखाराम मोने (संग्राहक)/(श्रीमंत होळकर-सरकार-पुस्तकमाला (पुस्तक २० वे)/मुद्रक व प्रकाशन/ शंकर नरहर जोशी/प्रसिद्धिस्थल चित्रशाला : २०२६, सदाशिव पेठ पुणे सिटी/१९२७/पृ. १ ते ३५६/ किं. २ रुपये.

२) उनि/ पृ. ७२

३) उनि/ पृ. ७४-७५

४) उनि/ पृ.८६

५) मराठी व्याकरणाची कुलकथा। अ. का. प्रियोळकर/ १९३६/पृ. १८; आधुनिक मराठीचे उच्चतर व्याकरण/ म. पां. सबनीस/ प्रकाशक - म. पां. सबनीस, मुद्रक - र. अ. मारेमकर, मुंबई, प्र. आ. १९५१/पृ. १०४.

६) मराठी भाषेचे व्याकरणकार व व्याकरण प्रबंधकार/ मो. स. मोने/ १९२७ / पृ. ८९

७) उनि. - पृ. ८९

८) उनि. - पृ. १००

## लेखकांचा परिचय

❋ **अरुण विनायक जातेगांवकर व वासंती अरुण जातेगांवकर**

डॉ. अरुण जातेगांवकर व वासंती जातेगांवकर ह्या दोघांना अमेरिकेतील विद्यापीठांतून गणितात डॉक्टरेट पदव्या आहेत. त्या दोघांनी गणितावरील पाश्चात्त्य नियतकालिकांमधून संशोधनात्मक अनेक लेख लिहले. २००१ साली सेवानिवृत्त होताना अरुण जातेगांवकर न्यूयॉर्कमधल्या फोर्डम् युनिव्हर्सिटीमध्ये गणिताचे प्राध्यापक होते आणि वासंती जातेगांवकर जर्सीमधल्या सीटन हॉल युनिव्हर्सिटीमध्ये संगणकशास्त्राच्या प्राध्यापिक होत्या. सेवानिवृत्त झाल्यापासून ती दोघे महाभारतात वाचन व लेखन करत आहेत.

E-mail : vasantijategaonkar@yahoo.com

❋ **सुनिल गोपाळ मराठे**

दारुगोळा कारखाना खडकी, पुणे येथून सरकारी अधिकारी म्हणून निवृत्त. साहित्याची आवड, तत्त्वज्ञान आणि विज्ञान याचा अभ्यास.

पत्ता :- फ्लॅट नं. ६, श्रद्धा अपार्टमेंट लेन न. १६ भांडारकर रोड, पुणे ४११ ००४.

❋ **डॉ. जयश्री पाटणकर**

मराठी विभाग प्रमुख. मराठी संशोधन केंद्र प्रमुख, एच्. पी. टी. कॉलेज, नाशिक.

पत्ता :- मराठी संशोधन केंद्र प्रमुख, एच् पी. टी. कॉलेज नाशिक. मो. ९२२६१२२२९९.

---

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
आमचे नवीन प्रकाशन

# साहित्याचे तर्कशास्त्र

## (तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांची साहित्यविषयक अध्यक्षीय भाषणे)

**संपादक : सीताराम रायकर, द. दि. पुंडे, पंडित टापरे**

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी अनेक प्रसंगी साहित्यावर आपल्या भाषणांमधून जे विचार मांडले त्या भाषणांचा हा संग्रह मराठी साहित्याच्या अभ्यासकांना आणि सर्वसामान्य वाचकांनाही मार्गदर्शक ठरावा असा आहे. या ग्रंथात शास्त्राजींनी संस्कृत साहित्यशास्त्राचे विचारमंथन तर केलेले आहेच, या खेरीज त्यांनी आधुनिक साहित्यविचाराचीही दखल घेतलेली आहे. हा ग्रंथ मराठी साहित्याच्या अभ्यासकांना अतिशय मौल्यवान ठरावा असाच संपन्न झालेला आहे.

संपादन मंडळाने प्रदीर्घ प्रस्तावना सुरुवातीस देऊन या ग्रंथाचे मोल अधिकच वाढविले आहे.

---

**पुष्ठे : ४२+ ४३७** **किंमत रू. ७५०/-**

**संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ,**
**३१५, गंगापुरी, वाई, जि. सातारा.**

अनुक्रमणिका








## लेखकांस आवाहन

नवभारत मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण नवभारतकडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी अशी विनंती आहे.

१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.

२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यासह द्यावेत.

३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही याची स्पष्ट कल्पना नवभारतच्या संपादकांना द्यावी.

४. नवभारतमध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात नवभारतमध्ये येईल किंवा येणार नाही हे यथावकाश कळविले जाईल याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.

आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.

- संपादक मंडळ

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रजिस्टर क्र. 11697/57



हे मासिक घ. वा. जोशी यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून
सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई